# वधू-संशोधन

( सामाजिक नाटक )

लेखक
पु. ग. सहस्रबुद्धे, एम. ए.
विज्ञान-प्रणीत समाज रचना, लपलेले खडक,
सत्याचे वाली, इ. पुस्तकांचे लेखक.

प्रकाशक
मॉडर्न बुक-डेपो, बुकसेलर्स अ‍ॅण्ड पब्लिशर्स.
आनंदाश्रमासमोर, पुणें २.
किंमत १२ आणे

# वधू--संशोधन

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

( नानासाहेब मनोळीकर यांचा वाडा. कोचें, खुर्च्या, कपाटें, यांनीं शृंगारलेलें दालन. नानासाहेब खुर्चीवर बसून टाइम्स, ज्ञानप्रकाश चाळीत आहेत. )

नाना—सुमा, ए सुमाताई ( पानें उलटतात; पुन्हां थोड्यावेळानें ) सुमा. ( गेनू 'पिर्तिचा ग छंद तुझ्या लागला' अशी लावणी गुणगुणत येतो. नानासाहेबांच्याकडे पाहून दचकतो; व मुकाट्यानें कपाटातून कांहीं कपडे काढून नेतो. )

नाना—अरे गेनू

गेनू—जी

नाना—अरे सुमा कुठें आहे बघ बरं.

गेनू—त्या नव्हं का खालीं बसल्यात आपल्या खोलींतच.

नाना—तिला सांग म्हणावं मी बोलावतों आहें.

गेनू—जी. ( जातो. )

[ नानासाहेब टाइम्स चाळीत बसतात. थोड्यावेळानें सुमन येते. कोठें तरी बाहेर जाण्याच्या तयारींत असल्यासारखी ती दिसते.]

नाना—हं. पावडर बिवडर फासून कुठें जायचा बेत आहे ?

सुमन—कुठे नाहीं.

नाना—कुठें नाहा ! मग उगीचच तयारी वाटतं एवढी ? कुठें तरी जायचं असलंच पाहिजे.

सुमन—खरंच नाहीं.......सांगू कां, त्या लिलीकडे जायचं आहे मला फराळाला.

नाना—ती परवा लग्न झालं ती ?

सुमन—हो.

नाना—पण हें बघ, आज तिला कळव मला येता यायचं नाहीं म्हणून.

सुमन—इश्श, तें कां ?

नाना—सांगतो. त्या गेन्याला पाठव चिठ्ठी देऊन.

सुमन—पण नाना......

नाना—सांगतो म्हटलना कारण तुला ? तूं आपली त्याला सांगून, धाडून, इकडे ये. ( गाल फुगवून जरा हिरमुसलें तोंड करून सुमन दाराशीं जाते. व गेनूला हांक मारते. तो येतो. )

सुमन—अरे त्या लीलाताईंच्याकडे जा.

गेनू—कुठुल्या !

सुमन—अरे परवां तूं माझ्याबरोबर नव्हता कां आलास ? मी हळदी-कुंकवाला गेले होते तेव्हां ? अन् काल सकाळीं मला बोलवायला नव्हत्या कां आल्या त्या ?

गेनू—हां. म्हंजी नाकाव आरशी हाये, ती काळ लुगड नेसल्याली आवा ती ?

सुमन—हो तीच. तिथें जा. अन् तिला म्हणावं...थांब नाहींतर मी चिठ्ठीच देते. ( चिठ्ठी लिहून देते ) हं. ही चिठ्ठी दे त्यांना. त्यांना म्हणावं मला कांहीं आज येतां येणार नाहीं. ( गेनू जातो ) आजच कायहो एवढं काम होतं नाना ? ( फुगीर गाल करून नानासाहेबांच्याकडे पाहाते. )

नाना—आतां रागावते आहेस. पण सांगितल्यावर लागशील हंसायला. आज कोण येणार आहे आपल्या इथें ओळख.

सुमन—दादा येणार असेल. इश्श पण दादा परवांच तर येऊन गेला. अन् इतक्यांत कशी सुट्टी झाली त्याला ? तीस तारखेला होणार म्हणून पत्रांत होत त्याच्या. आणखी नाना--( चटकन् आंत जाऊन एक फोटोचं

आल्बम घेऊन येते. ) दादानीं मला कॅमेरा घेऊन दिला होता ना ? एक-तीस फोटो काढले आहेत मी. पन्नास काढायचे ठरले होते तो यायच्या आंत आमचे. अन् हा आमच्या कुमुदचा आहे. माझ्या वर्गांत ती मुलगी आहे ना, तिच्या बहिणीचा. आणि नाना, आई म्हणाली ही मुलगी करायची दादाला.

**नाना**—अग पण दादा नाहीं यायचा आज.

**सुमन**—इश्श मग कोण ? विमल आत्या यायची आहे? अन् ती झाली कां बाळंतीण इतक्यांत ? अन् मग आपल्याला कसं नाहीं कळवलं त्यांनीं ! काय झालं आत्याला ?

**नाना**—अग पण जरा थांब. माझं ऐकूनही घेत नाहीस. दादा नाहीं न् विमल नाहीं. तुला माहीत नसलेलंच मनुष्य येणार आहे. सांगू. आज तुला पाहायला यायचे आहेत.

**सुमन**—हो. कांहीं तरीच.

**नाना**—खरंच. कालच मी गेलो होतो तिकडे त्या शारंगपाण्यांच्याकडे. ( सुमन टेबलाच्या कोपऱ्यावर एक हात टेकून व दुसऱ्या हातानें त्याच कोंपऱ्याशीं चाळा करीत उभी राहाते. मधून मधून पदर सावरते. तिची दृष्टी जमिनीकडे आहे ) छान आहे मुलगा तात्यासाहेबांचा. उंच, गोरा आहे.अगदी तुला हवा तसा.

**सुमन**—इश्श !

**नाना**—एम्. ए. चा अभ्यास करतो आहे. वडील असतात मुंबईला नोकरीला. त्यांना खूप मोठा पगार आहे. बहीण आहे, आई आहे; छान आहे सगळं. हं. मग पसंत आहेना तुला ? काय ? सुमाताई.

**सुमन**—मी हो काय सांगू ?

**नाना**—मग कोण सांगेल ? मी आपला जुन्या काळी असलो म्हणुन मी तसलं कांहीं करणार नाहीं हो. तुमचं तुम्हीं आपलं ठरवा. भेटा, बोला, होय नव्हे, पसंत नापसंत, सगळं तुमचं तुम्ही ठरवयाचं. झाली पसंती कीं येऊन

सांग मला ' नाना हा मुलगा पसंत आहे मला, करून द्या माझं लग्न याच्याशीं '

**सुमन**—हे हो काय ? हं ! मी नाहीं जा.

**नाना**—अग थट्टा नाहीं करीत मीं तुझी पोरी. खरंच सांगतो आहे. चांगलच तसं झालेलं. माणून मग भानगड नको. आणि आज त्या पद्माकरपंतांना पण मी तसंच सांगितलं आहे. म्हटलं या, भेटा, इथें बोलायचं असलं तर इथें बोला, हिंडायला जायचं असलं तर हिंडायला घेऊन जा म्हटलं तिला. आवडी निवडी समजल्या, मनं मिळाली म्हणजे बरं तेंवढं. खरं किं नाहीं ? तर खरंच सांगतो आहे तुला मी. म्हणले ते तर खुशाल जा त्यांच्या बरोबर. आमच्यादेखत घाबऱ्या घाबऱ्या दोन शब्द बोलून काय समजणार आहे ? बरं ना. ते आतां पांच वाजतां येतील. आतां वाजले आहेत साडेतीन. अवकाश आहे अजुन. पण तेवढ्यां वेळांत लिलींकडलं कांहीं आटपलं नसंत ना ?

**सुमन**—छे पांचलास तर सगळया जणी जमायच्या आहेत. मी आपली उगीचच आधीं जाणार होते.

**नाना**—मग बरं केलं चिठ्ठी धाडली ते. बरं. आतां मी जरा दुकानाकडे जाऊन येतो. ते पाचला येईन म्हणाले आहेत. मी पावणे पांचपर्यंत, किंवा आधींच म्हणेनास थोडा, पण येवढ्यांत येतो. जाऊन यायला हावंच एकदा. आलोच मी जाऊन हो. तुला कांहीं थाटमाट करायचा असला तर कर आणखी.

**सुमन**—कांहीं नाहीं आं करायचं मला.

**नाना**—नको. राहिलं. साधीच पोरगी इतकी सुरेख दिसते आमची, कीं कोणीही हसंत उचलून नील तिला.

**सुमन**—इश्श नाना !

**नाना**—बरं नाहीं. मग जातो हां मी. पावणे पांचच्या सुमारास येईन. [ नानासाहेब जातात, सुमन आरशांत पाहून जरा केसांची फिरवाफिरव करते. प्रभाकर प्रवेश करतो. दोघेंही किंचित् गोंधळल्यासारखे होतात. ]

**प्रभाकर**—आपलंच नांव सुमाताई ना ?

**सुमन**—हो.

**प्रभाकर**—आपले वडील...काय...

**सुमन**—नाना

**प्रभाकर**—नाना म्हणतां होय आपण त्यांना ? मी तात्यासाहेबच समजतो आहे. आहेत कां ते घरांत ?

**सुमन**—नाहीं ते आतांच बाहेर गेले.

**प्रभाकर**—बाहेर गेले ? अरे, घोंटाळा झाला जरा. त्यांनीं कांहीं सांगितलं नाहीं कां ? ते म्हणाले होते मी घरीं नसेन बहुतेक. पण घरीं सांगून ठेवीन म्हणाले होते.

**सुमन**—ते पावणे पांचच्या सुमाराला येणार आहेत परत.

**प्रभाकर**—पावणे पाच. अरे बापरे. मी तर साडेतीन चारच्या सुमाराला येतो म्हणून सांगितलं होतं.

**सुमन**—साडेतीन ! ते तर म्हणले पांच वाजता येणार म्हणून.

**प्रभाकर**—हरकत नाहीं. पण म्हणजे सांगून ठेवलं आहे तुम्हाला त्यांनीं. होना ! मग बराय ! ऐकण्यांत झाला असेल घोटाळा. पण मग आतां... काय बरं आतां करावं ? पावणेपांचच्या आंत ते नाहींच येणार ना ?

**सुमन**—साडेचारला बहुतेक येतो म्हणाले होते.

**प्रभाकर**—साडेचार. ( घड्याळाकडे पाहून ) छे. इतका वेळ नाहीं माला थांबता येणार. पावणेपांचच्या गाडीनीं तर आई जायची आहे. तुम्हाला त्यांनीं सांगितलं आहे कां तुम्ही माझ्माबरोबर यायचं आहे किंवा असंच कांहीं ?

**सुमन**—पण साडेचारपर्यंत ते येतीलच.

**प्रभाकर**—( किंचित् हंसून ) एरवीं मी तुम्हांला म्हटलं नसतं. पण आजची वेळ गेली म्हणजे मग फार घोटाळे होतील. मग दोनतीन महिन्यावर जाईल ते. आई जाणार आहे यात्रेला. ती कांहीं दोन महिने यायची नाहीं. अन् तिचीन् तुमची तर भेट व्हायला पाहिजे. ती म्हणाली तुमचं

तुम्ही ठरवा. पण ते आपलं वरवर आहे. ती आत्ताच्या गाडीनींच जायची आहे. कालच निघाली होती पण नानासाहेब कालच आले म्हणून मी आग्रहांनीं तिला थांबवून घेतलं. तुम्हांला सांगितलं असंल त्यांनीं यायला माझ्याबरोबर तर....

**सुमन**---पण ते आले म्हणजे तितकं बरं.

**प्रभाकर**---यांत शंकाच नाहीं. अन् मी एरवी असं म्हटलंही नसंत पण आज जरा हें होतं म्हणून. पण नसलं तुमच्या मनांत तर माझा कांहीं आग्रह नाहीं.

**सुमन**---मनांत नसण्याचं नाहीं कांहीं.

**प्रभाकर**---नाहीं. असलं तरी ते बरोबरच आहे मला कांहीं राग नाहीं यायचा त्याचा. उलट मी तसं म्हणणंच बरोबर नाहीं. बरं. पण मी मात्र जातो आतां. आईची गाडी चुकली म्हणजे ती रागवेल आणखी. ( गेनू येऊन वेडगळासारखा आ करून पहात उभा राहतो ) बरं. मग नानासाहेबांना सांगा मात्र. माफ करा म्हणावं माला. पण सध्यां दोनतीन महिने तरी आतां जमायचं नाहीं. ( तो जाऊं लागतो. सुमन गोंधळते. दोनतीन महिने पुढें गेल्यानें सर्वच अनिश्चित होईल. आणि त्यामुळें आतां न गेल्यानें नाना रागावतील असें तिला वाटूं लागतें )

**सुमन**---पण मग...

**प्रभाकर**---काय ?

**सुमन**---थांबतां नाहींच कां येणार साडेचारपर्यंत ?

**प्रभा**---छेः छेः आतांच पावणेचार झाले. साडेचारला तर माला घरून निघालंच पाहिजे. थोडं आधींच.

**सुमन**---पण मग नाना कदाचित् म्हणतील कां नाहीं गेलीस म्हणून. त्यांनी सांगितलं आहे जा म्हणून.

**प्रभा** --- वा. मग चला कीं. कार उभीच आहे माझी खालीं.

**सुमन**---मी आलेच. ( आत जाऊं लागते ).

**प्रभा**---अहो साडीबिडी बदलायची जरूर नाहीं. आहे ही कुठें वाईट दिसते आहे.उशीर होईल

**सुमन**---( ओठ आवळून हसूं दाबीत आंत जाते )

**प्रभा**---( गेनूस ) कायरे नांव तुझं.

**गेनु**---( पुढें येऊन ) जी, गेनु, गेनु नांव हाये माझं.

**प्रभा**---बरं हे बघ. मी आतां तुझ्या सुमाताईंना घेऊन जातो आहे. नानासाहेब आले म्हणजे सांग त्यांना. ते प्रभाकरपंत आले होते म्हणावं.

**गेनू**---परभाकरपंत ? बरं ऽ ऽ कान तुम्ही ?

**प्रभा**---तूं एवढं सांग म्हणजे समजेल त्यांना. प्रभाकरपंत, बरं कां.

**गेनू**---बरं

**प्रभा**---त्यांच्याबरोबर सुमाताई गेल्या म्हणावं. त्यांना सांग, म्हणावं थांबायाला वेळ नव्हता त्यांना. त्यांची आई जायची होती गांवाला. म्हणून गेले म्हणावं ते लवकर. सांगशील ना ?

**गेनू**---हा सांगन म्हंजो काय ?

( सुमन छत्री वगैरे घेऊन बाहेर येते. व प्रभाकराप्रमाणेंच गेनूला बजावते. तीं दोघं जातात. )

( गेनू वर्तमानपत्रें, कपडे, उचलून नीट जाग्यावर ठेवतो. काम करतांना लावणी गुणगुणतो--' राजाची हो राजकन्या बहु येक सुंदराजी... ' थोड्यावेळानें नानासाहेब येतात )

**नाना**---सुमा कुठे आहे रे ?

**गेनू**---त्या गेल्या नव्ह का बाहेर.

**नाना**---बाहेर गेली ? शाबास. काय आतां करावं या पोरीला. तरी बजावून सांगितलं तिला त्या लिलीकडे जाऊं नकोस म्हणून.

**गेनू**---नव्हं- नव्हं. त्या लिलाताईक नव्हं. त्यांजक नाय गेल्या.

**नाना**---मग ?

**गेनू**---त्ये आलत ना ? त्ये आपल...,

**नाना**—(जरा आनंदून) कोण? कुणी तरुण मनुष्य आला होता काय?

**गेनू**—हाव ना. त्यांच्या संगच गेल्याना ताई मोट्रींतून.

**नाना**—असं होय!

**गेनू**—मना म्हगाल त्ये, का सांग नानासायबान्ना. का ताईनला घेऊन श्यान ग्येलो म्हनुन सांग. परभाकरपंत नांव आहे माझं म्हगाल त्ये.

**नाना**—प्रभाकर कसलं पद्माकर नांव आहे त्यांचं.

**गेनू**—नाय ना. परभाकर म्हंगाल ना त्ये.

**नाना**—अरे तुला काय समजताय. आचरट आहेस तूं. नुसतं नांवसुद्धां तुला ध्यानांत ठेवतां येऊं नये म्हणजे काय? बरं ते असूं दे. सुमा त्यांच्याच बरोबर गेली ना? चांगलं झालं. मला ते म्हणाले होते पांच वाजतां येईन...

**गेनू**—ते म्हंगाल कां आय त्यांची गावाला जायाची व्हती म्हनुन जराशी तरती हाये.

**नाना**—आई गांवाला जायची आहे म्हणाले? काल नव्हते बोलले कांहीं. बरं असूं दे. आज ठरलं असेल. पण छान झालं- आतां असं कर, माझा तो वह्याचा रुमाल नेऊन ठेव गाडींत. मी आतां दुकानावरच जातो. आलो होतो मी तेवढ्याचसाठीं. माला वाटतं होतं साडेचार पावणेपाच होतील. पण लवकर आटपलं काम म्हणून घाईघाईनीच आलों. पण शेवटीं चुकामूक झालीच. त्यांत कांहीं बिघडलं नाहीं म्हणा. सुमा गेली ते बरंच झालं. आटप. मी जातों आतां. माला जायचं आहे आणखी एकदोन ठिकाणी. आज ती लाकडाची वाघीण घेतली आहे नवीन. बरं सुमा आली तर सांग तिला मी गेलो म्हणून. ( नानासाहेब जातात. गेनू पुन्हां मगाचीच लावणी गुणगुणत काम सुरू करतो. थोड्या वेळानें पद्माकर येतो. )

**पद्मा**—अरे नाना साहेब आहेत कां घरांत?

**गेनू**—नाय ना. आतांच नव्ह कां बाहेर ग्यालं.

**पद्मा**—बाहेर गेले! म्हणजे! हा काय प्रकार आहे? अन् त्यांची मुलगी रे? सुमन कां काय नांव आहेना तिचं.

**गेनू**—हा! त्येचं-बर त्या बि गेल्यात बाहेर.

**पद्मा**—त्या बि गेल्यात बाहेर. छान आहे. (जरा वेळ खुर्चीवर बसतो. गेनू आंत बाहेर कामासाठीं हेलपाटे घालीत आहे ) कुठे गेल्यारे त्या बाहेर ? येणार आहेत केव्हां ?

**गेनू**---त्या कयाच्या लवकर यायाच्या हायेत ? एक बाप्या आलता. असा व्हता तुमच्याच शिनचा. बर मर्द गडी व्हता पघा. त्याच्या संग गेल्या त्या.

**पद्मा**—अस्सं.

**गेनू**—हां. मोटर आन्हली व्हती त्या बाप्यानं. अन् मोट्रीत बसूनशान् द्वाघ गेली. मला म्हंगाल्या कीं गेन्या नानाना सांग कां मी लवकर यायाची न्हाई म्हनून.

( मोटरींत बसून ग जी-असें गुणगुणत कामाला लागतो.)

**पद्मा**—मोठे विचित्र गृहस्थ दिसताहेत हे नानासाहेब. माला बोलावल मुलगी पाहायला अन् आपण गेले निघून. यंव ! अन् ती मुलगी पण कुणा बाप्याबरोबर निघून गेली म्हणे. ठीक आहे. पण कायरे ए...गेनू .... ( तो येतो ) अरे तुला त्यांनीं कांहीं सांगितलं नाहीं कां ?

**गेनू**—काय नाय सांगातल. तुमचं काहीं काम हाये काय ? असलं तर सांगा मना, मही त्ये आलं म्हजी सांगून मी.

**पद्मा**—(जरा चिडून) कांहीं काम नाहीं माझं. विचित्र आहेत तुझे मालक न् त्यांची मुलगी पण. मी जातो आता.

**गेनू**—तसं नव्हं. बर नांव गांव काय बर असल कां नाय. त्यानला मी काय सांगू ? कान तुम्ही ?

**पद्मा**—नाव गांव समद आहे माला. तुझ्या मालकांना सांग म्हणावं ते पद्माकर शारंगपाणी येऊन गेले. [ जातो.

**गेनू**—( मोटरीत बसून ग जी हेंच कडवे वेडेवाकडे घोळून वाटेल तसें तमासगिरासारखे हातवारे करून गातो. ढुंगणावर मृदुंग वाजवतो. नाचतो फिरतो. इतक्यांत नानासाहेब येतात. त्यामुळें दचकून ओशाळून राहातो. )

**नाना**—गाढवा

**गेनू**---हं:नाय, तसं नाय.

**नाना**---नाय काय नाय. हजार वेळां तुला सांगितलं कीं इथें लावणी म्हणाची नाहीं म्हणून.

**गेनू**---लावनी नव्हं. लावणी कयाची. आपलं एहेरीच म्हनत व्हतो. म्या म्हनल कुणी नाय घरांत...

**नाना**---फिरून तेच. तुला काय परवा सांगितल मी ? घरांत कुणी असो नसो. इथें हा फाजिलपणा चालायचा नाहीं. पन्नास वेळीं बजावलं तरी तुझं पुन्हां आहेच.

**गेनू**---नाय नाय. फिरून नाय म्हनायचा आतां. तुमच पाय साक्षी ह्यात. भगवान् मावळाया चाललाय-फिरून म्हनायचा नाय कंधी मी लावनी.

**नाना**---परवा हेंच म्हणाला होतास.

**गेनू**---बर आतां फिरून नाय करायचा. म्हनताना गांवलो तर पायांतलं काढून दोन मारा.

**नाना**---चल, फाजिलपणें बोलतो आहेस. ध्यानांत ठेव आतां. फिरून लावणी ऐकली तुझी तर मी इथून हाकलून दीन तुला. गांवाला परत जावं लागेल तुझ्या. काकासाहेबांनीं पाठवला तुला म्हणून इतके दिवस तरी ठेवला पण....

गेनू---पन नायना म्हनायचा फिरून. तुम्ही इथून माला लावून दिलं तर काकासाहेब दारांत उभं नाय करायच ना. मना म्हगाल कां नाना सायबान्ना योक चांगला गडी होवाय. म्हनुन तुला पाठवितो. समद नीट, बयाजवार, यवस्तेवार करीत जा. असं सांगून मना पाठिवलं ना त्यांन्नीं ! अन असा परत ग्यालों इथूली ख्याटर खाऊन मही काय म्हनतीन त्ये. हां म्हनून ?

**नाना**---मग लेका मालाच उलट बजावून सांगतोस होय ?

**गेनू**---बजाऊन नाय. बजाऊन कयाच आलय.

**नाना**---बरं, इतक्यांत इथें आलं होतं कां कुणी ?

**गेनू**---हा. योक बाप्या आलता ना.

**नाना**---कोण ? नांव सांगितलं कां त्यानीं.

**गेनू**---( पुन्हां नांव चुकेल म्हणून घाबरतो व खोटेच सांगतो. ) नांव नाय सांगितलं त्यानी. म्या म्हनलं काय काम हाये तुमचं तर म्हंगाल काय बी काम नाय.

**नाना**---नांव नाहीं सांगितलं ? तो शिवराम म्हसकर येऊन गेला कां काय ? मी गेलो त्याच्याकडे तर मला कळलं कीं आपल्याकडे आलाय म्हणून. केवढा होता तो ?

**गेनू**---तो पहिला बाप्या आलता कां ताईन्ना न्यायाला त्याच्या शिनचा व्हता.

**नाना**—हां मग तोच असेल. बरं जा तूं. ( गेनू जातो. एक गृहस्थ येतो.

**गृहस्थ**---शारंगपाणी इथेंच राहातात ना ?

**नाना**—शारंगपाणी ? नाहीं. कुठला पत्ता सांगितला आहे तुम्हांला ?

**गृहस्थ**---हे पहा....( हातांत एक कागद देतो. ) तात्यासाहेब शारंगपाणी पाचशेसात गुरूवार.

**नाना**---पांचशे सात गुरूवार ? छे, हा तर आमचा वाडा. मनोळीकरांचा. पण...थांबा हां. ( कपाटांतून एक वही काढतात ) तात्यासाहेब शारंगपाणी ना. पांचशेंसाठ गुरवार असा आहे. पत्ता त्यांचा साठ. हा पाचशेसात आहे.

**गृहस्थ**---असं हो. मी साठाच्या ऐवजीं सात ऐकलं. माफ करा बरं कां ?

**नाना**—मगाशीं आला होतां आपण ?

**गृहस्थ**---हो. खालीं येऊन गेलो मी. बराय येतो. [ तो जातो.

**नाना**—अरे गेनू ( तो येतो ) सुमा आली नाहीं ना अजून.

**गेनू**—नाय ना. अजून नाय आल्या.

**नाना**—बरं मी वरच्या खोलींत जातो आहे आतां. कुणी आलं तर सांग मी वर आहे म्हणून. नाहींतर बावळटासारखं सांगशील मी घरीं नाहीं म्हणून.

**गेनू**—नाय नाय, सांगन वर हायेत. [ पडदा.

## प्रवेश दुसरा

( तात्यासाहेब शारंगपाणी यांचें घर. एक खोली. टेबलें खुर्च्या, इतस्तत: पडलेली वर्तमानपत्रें, फोन वगैरे. श्यामकान्त प्रवेश करतो. खोलींत कोणीच नाहीं असें पाहून दारांतून आंत डोकवतो. जरावेळ खुर्चीवर बसून वर्तमानपत्रें चाळतो. पण पुन्हां अस्वस्थ होऊन दाराजवळ जातो व हाक मारतो.)

**श्याम**—सुमती ! ए सुमती ! अहो शारंगपाणी.

**सुमति**—( आंतून ) आले आले ( बाहेर येऊन ) कोण आहे ? इश्श तुम्हीच हो. मग एवढी अगदीं शारंगपाणी म्हणून हाक मारली ?

**श्याम**—मग काय करूं ? सुमती म्हणून दोन तीन हाका मारल्या. तूं ओच देईनास.

**सुमति**—मी मागल्या दारीं होते तिकडे. फार वेळ नाहींना झाला येऊन ?

**श्याम**—दोनतीन मिनिटं झालीं असतील. कामांत आहेस कांहीं ?

**सुमति**—छे बाई ! कां ?

**श्याम**—मग चल आपण सिनेमाला जाऊं आज. आज ते 'इट् इज् ए गिफ्ट' लागलं आहे. रॉयल मधें. डायना लेविस आहे.

**सुमति**—माला नाहीं आवडत तिचं काम. अन् आज माला येताही यायचं नाहीं.

**श्याम**—काम कुणाचं आवडत नाहीं ? डायना लेविसचं ? मग चल भक्त प्रल्हाद, संभाजी, चंद्रसेना त्याला जाऊं.

**सुमति**—तसं म्हटलं वाटतं मी ?

**श्याम**—नाहीतर काय ? मागं त्या बार्बारा स्टॅन विक्बद्दल असंच म्हणाली होतीस. तो मेसेज टु गार्सिया चित्रपट आला होता तेव्हां.

**सुमति**—पण इथें पुष्कळांनीं त्यांच्याविरुद्ध लिहिलं होतं हो.

**श्याम**—( तुच्छतेनें हंसून ) एकाला तरी समजायची अक्कल आहे कां इथें ? एकेक मोठे अरण्यपंडितच पडले.

**सुमति**—–पण ते कशाला पाहिजे ? उगीचच वाद. अन् खरंच कलकत्याला तो थेसिस पाठवला होता त्याच काय झालं ?

**श्याम**—–काय व्हायच आहे. परत आला तो.

**सुमति**—–परत आला !

**श्याम**—–यांत आश्चर्य काय आहे ? अग अनेक भानगडी असतात त्यांत. अगोदर समजण्याइतकी अक्कल पाहिजे मी काय लिहिलं होतं ते. मग मराठी बंगाली हे तट. त्यांतून सुटून काय व्हायचे तें होणार. पण ते जाउ दे. येते आहेस ना तूं ?

**सुमति**—–आज खरंच माला येतां नाहीं येणार. आज काम आहे माला.

**श्याम**—–काम आहे ? मगाशीं विचारलं कामांत आहेस कां तर म्हणालीस नाहीं. अन् आतां...

**सुमति**—–म्हणजे तसं नाहींच आहे काम. पण बाहेर जातां नाहीं यायचं. आईनीं सांगितलं आहे.

**श्याम**—–आतां आई सांगेल, तात्या रागवतील, सगळं होईल. वाटेल त्या सबबी आठवतील तुला.

**सुमति**—–म्हणजे सबबी सांगतें वाटतं मी ? आतांपर्यंत किती वेळां सांगितल्या आहेत सबबी ?

**श्याम**—–मग आत्तांच कां सांगतेस ?

**सुमति**—–पण आतां खरंच आहे मुळीं. आज माला नाहींच यायला व्हायचं.

**श्याम**—–पण कां नाहीं व्हायचं ?

**सुमति**—–इश्श पण असं काय करतां तुम्ही तरी अगदीं ? नाहीं एक दिवस आले म्हणून काय झालं ? आइचं काम आहे म्हणून सांगते तर म्हणे सबबी सांगते आहेस.

**श्याम**—– बरं मी एकटाच जातो. तूं जा आपली भक्त प्रल्हादाला

पुण्यही लागेल थोडं. पण हें बघ मी रात्रीच्या गाडींनींच जाणार आहे धुळ्याला. तेव्हां आतांच निरोप घेऊन ठेवतों.

**सुमति**---आजच का जाणार ? मी समजतें आहे उद्यां जाणार म्हणून.

**श्याम**---मग उद्यां सिनेमाला जायचं ठरवलं होतस कां काय ?

**सुमति**---पहा. अगदीं अंत पाहातां तुम्ही. मालाच जसं नको आहे तुमच्याबरोबर यायला.

**श्याम**---काय सांगाव ?

**सुमति**---असं कां ? बरं हो.

**श्याम**---बरं रागावूं नकोस. मी जातो आतां.

**सुमति**---महिन्याभरानीं परत येणार ना ?

**श्याम**---बहुतेक. सिनेमाला यायचं कबूल केलस तर नक्की येईन.

**सुमति**---मुळींच येणार नाहीं मी. ( श्यामकान्त हसत जातो )

( कमळाबाई, सुमतीची आई येते.)

**कमळा**---कोण ग आल होतं.

**सुमति**---शामकान्त.

( कमळाबाई कोचावर बसतात. थोडा वेळ दोघी शून्य दृष्टीनें पाहातात. मग सुमति एकदम आईजवळ बसून जरा चिडक्या स्वरानें बोलते. )

**सुमति**---काय ग हे आई तुमचं तरी ?

**कमळा**---अग मी तरी काय करणार इथें ?( तिच्या पाठीवर हात टाकते) मी तुला सांगितल ना ? माला कांहीं श्यामकान्त पसंत नाहीत असं नाहीं. पैशांनीं आपल्यापेक्षां थोड कमी स्थळ आहे तें, पण तुला सुख असलं त्यांत तर पैशाकडे पाहून काय करायचं आहे ! अन् तसं मी सांगितलं सुद्धां. पण ते पोतनिसांच्याकडचं स्थळ भरलं आहे ना मनांत? आज तुला पाहायला यायचे होते ते तेच. प्रभाकर नांव आहे वाटतं त्या मुलाचं. तो मुलगा म्हणे फार चांगला आहे. अन् जमलं तर तिथेच द्यायची तुला असं आहे मनांतन. मी श्यामकान्ताबद्दल म्हटलं तर माला सांगितलं कीं तें नाहीं जमल तर मग पाहू.

**सुमति**---असं सांगितलं आहे तात्यांनीं ? मग मी गंमतच करते हो आतां.

**कमळा**—म्हणजे काय ? गंमत कसली करतेस ?

**सुमति**---मी मुळी पसंतच पडायची नाहीं त्यांना.

**कमळा**—वा. वेड्यासारखं कांहीं करूं नकोस हो. नाहींतर रागावून घेशील आणखी.

**सुमती**—अग तात्यांना मुळींच कळायच नाहीं. तूं कांहीं काळजी करूं नको.

**कमळा**—पण कायग आज तुला पहायला यायचे होते ते कसे नाहीं आले ? तो मुलगा स्वत:च यायचा होता ना ?

**सुमती**—मला ग काय माहिती ?

**कमळा**—तसं नव्हे ग, पण साडेतीन चार वाजतांच ते येणार आहेत म्हणून माला सांगितलं जातांना अन् आतां तर सहा वाजयला आले. अन् आजंच इथें अगदीं सोलापूरचं काम निघालं.

**सुमती**—अन् खरंच दादाही आला नाहीं अजून. तोही मुलगी पाहायलाच गेला आहेना त्या यांच्याकडे......काय बाई...

**कमळा**—तो गेला आहे इथन सवाचार वाजतांच. तसाच गेला असेल खेळायला नाहींतर आणखी कुठे. येईल आतां. नाहीं. पण आज खेळायला जायचं नाहीं म्हणाला होता. हा आलाच माला वाटतं. [ पद्माकर येतो ]

**पद्मा**—काय ताईसाहेब पोतनिशीण बाई होणार कां नाहीं तुम्हीं ?

**सुमति**—पण पोतनीस बुवा आले असले माला पाहायला तर ना !

**कमळा**--काय हे सुमति ?

**पद्मा**---म्हणजे ? आलेच नाहींत ते पोतनीस ? कां थाप देते आहेस मला ?

**सुमति**—थाप कशाला देऊं ? विचार आईला ?

**पद्मा**—खरंच आई ? ताईला पाहायला यायचे होते आलेच नाहींत ?

**कमला**—अरे कुण्णी आलं नाहीं त्यांच्याकडचं.

**पद्मा**—असं कसं झालं ?

**कमळा**——मी तरी तेंच म्हणत होतें आतां तिला.

**सुमति**——पण तूं गेला होतास मुलगी पाहायला तिथें काय झालं ? ती मुलगी शारंगपाणिबाई होणार आहे कां नाहीं ?

**पद्मा**——(आपण तेथें गेलों असतां घरीं कोणीच नव्हतें हें सांगण्यांत आपली फजिती आहे असें वाटल्यामुळें पद्माकर उडवाउडवीचीं उत्तरें देतो) अग, मी गेलोंच नव्हतों.

**कमळा**——गेलाच नव्हतास ? तिकडे जातो म्हणून मला सांगून ना बाहेर पडलास ?

**पद्मा**——अग तसं नव्हे आई. ती मुलगी कांहीं इतकी चांगली नाहीं.

**सुमति**——म्हणजे बघ हो आई बोलणं याचं. घटकेंत म्हणतो गेलोच नाहीं मुलगी पाहायला. घटकेंत म्हणतो मुलगीच चांगली नाहीं.

**पद्मा**—आपल्याला कांहीं ती मुलगी पसंत नाहीं बुवा.

**कमळा**—अरे मग तसं सांग. आलोच नाहीं न् गेलोच नाहीं हें काय ?

**सुमति**——पण काय रे, दिसायलाच वाईट आहे कारे ?सांगना मला सगळं. पसंत नाहीं पडायची तुला असं मला वाटलंच होतं आधीं.

**पद्मा**——ते कशावरून ?

**सुमति**——अरे ते वडील आले होते ना तिचे. त्यांना पाहूनच माला वाटलं. एकंदर गबाळाच अवतार असायचा म्हटलं मुलीचा. आई मी तुला म्हटलं नाहीं मगाशीं ? दादाला कांहीं म्हटलं ती मुलगी पसंत पडायची नाहीं. झालंच तसं. अगदीं गबाळी होती ना रे ?

**पद्मा**——अग अगदीं गबाळी ! कांहीं विचारूं नको.

**सुमति**——वाटलंच माला. नाका डोळ्यांनीं तरी बरी होती कां ?

**पद्मा**——अगं मी नाहीं एवढं लक्ष दिलं. तो गबाळा अवतार पाह्यला न् मनच फिरलं माझं. मी आलो निघून झालं.

**कमळा**——म्हणजे प्रश्नबिश्न नाहीं कांहीं विचारलेस ?

**पद्मा**——तसे विचारले एकदोन. पण माला नाहीं बुवा पसंत ती मुलगी.

**कमळा**——मग त्याच्याबद्दल कोण काय म्हणतं आहे ? आमचा कांहीं आग्रह नाहीं कांहीं हीच मुलगी तूं कर म्हणून.

**सुमति**---त्याला तेवढी वाटले ती मोकळीक आहे न् माला कांग मग तसं नाहीं ?

**कमळा**—असं बोलूं नये सुमति.

**सुमति**—हो ऽऽ असं बोलूं नये.

**कमळा**—बर. चला. आतां कांहीं ते पोतनीसांच्याकडचे येत नाहींत. चल आत. ( कमळाबाई व सुमति जातात. टेलिफोनची घंटा वाजते )

**पद्मा**—हो कोण ? मी पद्माकर. कोण प्रभाकरपंत. म्हणजे पोतनीस ? बरं काय म्हणालांत, मुलगी पसंत आहे ! म्हणजे ? अहो तुम्ही आला होता कधीं आमच्या इथें मुलगी पसंत करायला ? येऊन गेला ? मग ताईनीं खरंच थाप दिली कां काय माला ? शाबास. कारमधून ? तुमच्या घरीं ? अहो सांगतां तरी काय ? अं हं विचित्र वाटलं असं नाहीं म्हणत मी. पण ताई म्हणाली तुम्ही मुळीं आलाच नाहींत पहायला. लाजत असतील सांगायला ? वा. अहो ही कसली लाज. बर पण तुम्हाला पसंत आहे म्हणतां ताई आमची ? हो सुमाताई. बरं. ते करतो आतां सगळं. वडील आज जरा गांवाला गेले आहेत. उद्या परवां येतील. अच्छा (टेलीफोन ठेवून,) ताई, ए ताई ए सुमिटले, इकडे ये आधीं. अहो ताईसाहेब.

**सुमति**—( प्रवेश करून ) अरे असं ओरडायला काय झालं ?

**पद्मा—बाईसाहेब खरं बोला काय ते ?**

**सुमति**—म्हणजे काय ? असं काय तूं करतो आहेस ?

**पद्मा**---बऱ्याबोलांनीं खरं सांग काय ते. नाहींतर बघ.

**सुमति**—अरे पण काय सांगू खरं ? काय मी खोटं सांगितलं आहे ?

**पद्मा**---प्रभाकरपंत इथें आले होते कां नाहीं ? त्याच्याबरोबर तूं मोटारींतून गेली होतीस का नाहीं ? तुमचं एकमेकांशीं बोलणं झालं कां नाहीं ? खरं सांग. मला कळलं आहे सगळं,

**सुमति**—तुला वेड लागायचीच बाकी राहिली तेवढी.

**पद्मा**—हे बघ,आतां त्रागा करून चालायचा नाहीं. लाजायचं लाजायचं म्हणजे किती ? अजिबात आलेच नाहींत म्हणून सांगायचं. वा ग वा ! उद्यां

मी तात्यांना लिहिलं असतं तसं म्हणजे काय म्हणजे असते ते! इतक्या कुठें लाजत असतात कां मुली ?

**सुमति**—अरे पण मी कुणाला लाजले ? लाजून काय नाहीं सांगितलं तुला? ते कोण मला पाहायला यायचे होते ते आले नाहींत एवढच सांगितलं ना ?

**पद्मा**—मग तेंच तर खोटं सांगितलंस.

**सुमति**—खोटं ?

**पद्मा**—शंका आहे काय ? आतां लपवूं नकोस ताई. तुम्ही कसे गेलात कुठे गेलात, बोलणं काय झालं तुमचं, हे सुद्धां माला कळलं आहे.

**सुमति**—कुणाचं बोलणं ?

**पद्मा**—तुझ न् प्रभाकर पंतांचं. तूं गेली होतीस मोटारींतून त्यांच्या बरोबर. सांग खरं आहे कां नाहीं.

**सुमति**—कुणी सांगितलं तुला हें ?

**पद्मा**—आतां त्यांचा फोन आला होता. ते म्हणाले माला मुलगी पसंत आहे. अन् त्यांनींच माला हें बाकीचं सांगितलं सगळं

**सुमति**—आतां कहर झाला बाई त्यांच्या पुढें.

**पद्मा**—त्यांच्यापुढें कां तुझ्यापुढें ? मी म्हटलं त्याना तर ते म्हणाले तुमच्या सुमाताईचा स्वभाव फार लाजाळू आहे. म्हणून त्यांनी सांगितलं असेल, पाहायलाच आलेच नाहींत म्हणून.

**सुमति**—मोठा फाजीलच दिसतो आहे मनुष्य हा. बघूं बघूं माला काय म्हणताहेत ते ? घे पाहूं त्यांचा नंबर. ( पद्माकर पुन्हा फोन करतो. )

**पद्मा**— हो. मी शारंगपाणी. हे पहा पुन्हां थोडासा त्रास देतो आपल्याला. आईनीं विचारायला सांगितलं म्हणून विचारतो.

**सुमति**—आईनीं काय सांगितलं आहे ?

**पद्मा**—तूं गप्प बस ग. बरं कां...आपण घरच्या वडील मंडळींचा विचार घेऊनच सांगितलतना आमची ताई पसंत आहे म्हणून ? नाहीं आपलं...बरं. मग हरकत नाहीं.

सुमति—त्यांना विचार केव्हां आला होतात म्हणावं तुम्ही ? ताई भेटली होती कां तरी तुम्हाला ?

पद्मा—हे पहा प्रभाकरपंत. ताईचं आमच्या कांहीं लाजेचं वेड जात नाहीं. ती म्हणते तुम्हीं आलाच नाहींत, हिंडायला गेलाच नाहींत. तेव्हां आतां असं करतों. मी येऊन जातो एकदां. कां ? काम आहे ? कारकुनाला पाठवतां ? बरं. हरकत नाहीं. छे छे: गोंधळ कसला ? आपलं उगीच. मुली लाजायच्याच अशा. ( सुमती टेलीफोनला हात घालते. ) ताई तूं गप्प बैस हां आतां. हो बरं. कारकुनाला--कोण कृष्णाजीपंत ? द्या त्यांना पाठवून बरं. ( फोन खाली ठेवतो ) ( सुमतीस ) झालं आतां ?

सुमति—काय झालं काय ? येऊं दे त्या कृष्णाजीपंताला. भय्याकडून नाक चेचतें चांगलं त्याचं.

पद्मा—आई, ए आई. ताईची बघ काय मजा झाली आहे. ( कमळा बाई येतात. ) अग ही वाटेल तशी थापा देत होती आपल्याला.

कमळा—ऐकलं मी सगळं. पण असं कसंरे ती खोटं बोलेल ?

पद्मा—अग मुली असंच करतात आई.

सुमति—एहेरे. म्हणे मुली असंच करतात. मुलगेच करीत असतील.

पद्मा—बरं कां आई, सगळ्या मोठमोठ्या कवींनीं असं लिहिलं आहे. मुलीं नाहीं म्हणाल्या कीं बेधडक हो म्हणून समजावं तिथे. दाखवूं तुला काढून ? ( पुस्तकं शोधूं लागतो. टेबलावरील गोंधळांतून अनेक पुस्तकें खालीं पडतात. ) ताई हीं पुस्तकं रचून ठेव हीं तेवढी.

सुमति—( खोचून ) हो हो. पुस्तकं रचून ठेव हां तेवढी. परवां माझं पुस्तक मी पाहयला आलें तर म्हणे हात नाहीं लावायचा माझ्या पुस्त-कांना. अन् आतां अगदीं पुस्तकं रचून ठेव हां तेवढीं. त्या नव्या शारंगणाणीण-बाई आल्या म्हणजे सांग त्यांना.

पद्मा—अग पण तोपर्यंत तर तूं रचशील ना ? पोतनीशीण बाई होईपर्यंत तर काम कर माझं. अरे पण पुस्तक कसं सापडत नाहीं ?

सुमति—तुला कधीं काय सांपडत असतं वेळेवर ?

**पद्मा**—असं कसं होईल. आतां काढतो बघ शोधून. बरं जाऊं दे. पण म्हटलेलं आहे यांत शंकाच नाहीं, बरं का आई, शेक्सपीयर, जेन ऑस्टिन्

**सुमति**—चुलींत घाल तुझा तो शेक्सपीयरन् जेन ऑस्टिन्. ए आई तूं ऐकूं नकोस ग याचं कांहीं. तो कोण फाजिल मनुष्य फोन मधून सांगतो...

**कमळा**—असं काय बोलतेस ताई तूं ह्याच्यासारखं. चांगलं नाहीं दिसत ते.

**पद्मा**—ऐका ताईसाहेब. आईचं तरी ऐका म्हटलं.

**कमळा**—खरंच, पण सुमा, नव्हते ना आले ते ? मी कांहीं तूं खोटं बोलतेस असं नाहीं म्हणत हो. पण लाजून जर सांगत नसलीस......

**पद्मा**—तर तशी कांहीं लाजूं नकोस.

**सुमति**—तूं सुद्धां तसंच म्हणायला लागलीस हो. मी जातेच आपली. मीच खोटी आहे, मूर्ख आहे. [ जाते.

**कमळा**—आतां काय करावं. अग ए वेडे. तसं नाहीं कांहीं मी म्हणत. ताई, इकडे ये. आलीस कां ? पद्मा आतां तूं बोलूं नकोस आं तिला कांहीं.

**पद्मा**—बरं. आतां ते कारकून येतातच आहेत त्यांचे. नाहींतर मीच उद्यां जाऊन येईन तिकडे. अन् खरंच मी जातो आतां विश्वनाथाकडे. गाडी चुकेल माझी.

**कमळा**—जा. पण रात्रीचा निजायला राहूं नकोस हो तिकडे. मला झोंप येत नाहीं आतांशा.

**पद्मा**—राहाणार नाहीं मी. पण शेवटच्या गाडीनीं यायचं म्हणजे बारा तरी होतील. ( कोट घालून पद्माकर जातो. फोनची घंटा होते. )

**कमळा**—ताई...अग हा फोन बघ कुणाचा आला आहे. आली कां ( सुमति चिडक्या मुद्रेनेंच बाहेर येते. व एकदम फोनकडे जाते )— असं चिडावं काय वेड्यासारखं.

**सुमति**—तूं माला सांगू नकोस हां कांहीं. तूंसुद्धां म्हणायला लागलीस लाजूं नको, लाजूं नको.

**कमळा**—अग मी नाहीं म्हटलं तसं.

**सुमति**—नाहींतर काय ? म्हणे लाजून सांगत नसलीस तर तसं करूं नको. इतकी लाजते वाटतं मी ?

**कमळा**—बरं हं. तो फोन पहा.

**सुमति**—( फोन घेऊन ) हो शारंगपाण्यांच्याकडूनच.

**कमळा**—कोण ग ?

**सुमति**—अग ते नानासाहेब. दादा मुलगी पाहायला गेला होता ना. ते दिसताहेत. बरं. तो म्हणाला होता फोनवरून कळवीन म्हणून? पण तो घरांत नाहीं आतां. हो. हा इतक्यांतच बाहेर गेला. जेवायला गेला आहे एका मित्राकडे. हो सांगितलं. त्याला कांहीं मुलगी पसंत नाहीं. छेः घोटाळा-बिटाळा कांहीं नाहीं. दोनतीनदां विचारलं मी त्याला. नाहीं पसंत म्हणूनच त्यांनीं सांगितलं. बरं... ( फोन ठेवते )

**कमळा**—आजचा दिवसच वाईट लागला. त्याला मुलगी पसंत पडली नाहीं. तुला पाहायला यायचे ते आलेच नाहींत.

**सुमति**—कां. आले कसे नाहीं. आले, पसंत केली माला त्यांनीं, मी लाजले तुम्हांला सांगायला, असं नाहीं कसं.

**कमळा**—चाहाटळ आहेस तूं. ( पडदा. )

---

## प्रवेश ३ रा

( नानासाहेबांचे घर. सुमन खिन्न होऊन एका खुर्चीवर बसली आहे. नानासाहेब पाठीवर हात ठेवून येरझारा घालीत आहेत.)

**नाना**—त्यांच्या आईनीं तर नसेल ना सांगितलं नको म्हणून ? काय ग. सुमा ?

**सुमन**—काय ?

**नाना**—आईनीं मोडता घातला असेल, नको करूं ही मुलगी म्हणून सांगितलं असेल, असं नांहीं ना वाटत तुला ?

**सुमन**—मी कसं सांगू ते ?

**नाना**—अं हं. सांगतां नाहीं येणार हे तर आहेच. पण तुला तिथल्या रागरंगावरून काय दिसलं ? बोलली कां त्यांची आई तुझ्याशीं नीटपणें ?

**सुमन**—हो.

**नाना**—काय म्हणली, सांगना सगळं काय झालं ते ?

**सुमन**—त्यांच्या बोलण्यावरून तर त्या कधींच नको म्हणायच्या नाहींत असं वाटतं. त्या म्हणल्या फार चांगली सून मिळाली माला, आपल्या घराला अशीच मुलगी हावी. अमुकन् तमुक किती तरी बोलत होत्या.

**नाना**—असं ?

**सुमन**—अन् एक दोनदां नाहीं, पन्नास वेळां. मला अगदीं जवळ बसवून घेतली, आमच्या घरीं असं आहे तसं आहे, जशी कांहीं मी झालेच सून त्यांची.

**नाना**—अन् मग मुलगी पसंत नसायजोगं काय झालं एकदम ? कां त्यांना स्वतःलाच पसंत नाहीं. पण तसं तर कांहीं दिसलं नाहीं ना तुला ?

**सुमन**—( दृष्टी खालीं ठेवून किंचित् हंसून ) छेः !

**नाना**—बोलणं चालणं पुष्कळ झालं ना तुमचं ?

**सुमन**—हो.

**नाना**—मग त्यांत तू जास्त कमी नाहीं ना बोललीस कांहीं.

**सुमन**—इश्श, असं कसं मी बोलेन ?

**नाना**—म्हणूनच म्हणतो. तू कांहीं बोलणार नाहींस वेड्यासारखं ही खात्री होती. म्हणून तर धाडली तुला. आलीस तेव्हां हंसत हंसत आलीस, सांगितलस थोडसं तेही बरं वाटलं. म्हणून म्हटलं जमताय वाटतं नीट. पण फोन करून विचारतो तो तिसरंच आपलं. म्हणून म्हटलं कांहीं झालं होतं कां काय ? तसं नाहीं कांहीं म्हणतेस ? तुझं न् त्याचं चांगलं रहस्य जमलं होतं अगदीं ?

**सुमन**—मला नाहीं माहीत आं.

**नाना**—अग तसं नव्हे. हा गोंधळ झाला आहे. म्हणून विचारतो. अन् पुढें कांहीं तरी ठरवायला नको कां ? यांची कांहीं असली थोडी अशा तर

प्रयत्न करून पाह्यचा. नाहीं पसंत म्हणले असले तरी जाऊन येईन पुन्हां एकदां. काय झालं, काय नाहीं, देण्याघेण्याचं कांहीं आहे कां काय, कांहीं तरी विचारतां येईल. पण मुळींच आशा नसली तर, तर नाद सोडून द्यायचा न् दुसरीकडे पाहायचं कुठें.

**सुमन**—छेः छेः तसं नको.

**नाना**—( हंसून ) नको ? स्थळ आवडलेलं दिसताय बरं कां. होना ?

**सुमन**—पण फिरून एकदां विचारून पाहावं.

**नाना**—आलं ध्यानांत. जाईन मी. मग काय करायचं ? ( खालीं बसून एक वर्तमानपत्र उघडतात. मागल्या बाजूनें गेनू येतो. त्याच्या देखत आपल्या लग्नाचें बोलणें व्हावें हें बरें न वाटून सुमन त्याला खुणेनें जायला सांगते. जायच्या ऐवजीं तो बावळटासारखा आं करून आणखी पुढेंच येतो. नाना संतापले आहेत. तूं आंत जा. असें सुमन खुणेनें त्याला सांगतें. तो पुढें येऊन दाबल्या आवाजानें 'काय झालं !' कां संतापल्यात ? असें विचारतो. सुमन चिडून मोठ्यानें ' चालता हो इथून ' असें ओरडते. नानासाहेब किंचित् वळून मागें पाहातात. गेनू पळून जातो. )

**नाना**—काय झालं ?

**सुमन**—वेंधळं आहे मेलं. कांहीं त्याला समजतच नाहीं. ( प्रभाकराचे कारकून कृष्णाजीपंत येतात. त्यांनीं सुमनला पाहिलेली असल्यामुळें ते तिला ओळखतात. व त्यामुळें तर्कानें दुसरे नानासाहेब हें त्यांना समजतें. ते लवून नमस्कार करतात. सुमन उठून जरा मागल्या बाजूला उभी राहाते. )

**कृष्णाजी**—मी आप्पासाहेबांच्याकडून आलो आहे.

**नाना**—आप्पासाहेबांकडून ? मी नाहीं समजलो. ( सुमन चटकन् पुढें होऊन—' मी मघाशी गेले होते ना तिथले हे कारकून आहेत, असें नानांना सांगते ) असं असं. या. मी कांहीं पाहिलेलं नाहीं आपल्याला. बसा ना.

**कृष्णाजी**—साहजिक आहे. गांठच नाहीं पडलेली. साहजिक आहे. एक दोनदा भेट झालेली असली म्हणजे होते ओळख. हंः हंः ! त्यांत काय आहे. साहजिक आहे तें. त्यांत काय आहे. ( खाली बसून उपरण्याच्या

टोकानें तोंडबोंड पुसतात व वारा घेतात ) श्‌ श्‌....फार उष्मा आहे आज दोन दिवस. छे: अतीच.

**नाना**—हं ! आभाळ निघाल आहे.

**कृष्णाजी**—पण भारीच. अगदीं आमच्या तिकडच्यासारखा काहार आहे अगदीं. खानदेशांतल्यासारखा. तिकडे उन्हाळा म्हजे काय पुसूं नका. छे: छे: इथें कांहींच नाहीं ना त्याच्यापुढें !

**नाना**—असं.

**कृष्णाजी**—कांहीं बोलूं नका. थंडी पडायला लागली कीं अशी पडतो, अशी पडती कीं काय सोय नाहीं. उन्हाळा म्हंजे उन्हाळा. रात्री बारा वाजेपर्यंत तापलेलं नुसतं. बारा काय दोन म्हणा. नुसतं तापलेलं. झोप म्हणून यायची नाहीं. येतीच कुठनं ? नांव नाहीं. जरा कुठं डोळा लागतो न लागतो तो पुन्हा सुरू सात पासून. साडेसहाच. सात कशाला. त्या ह्यांनीं इथें कांहींच नाहीं.

**नाना**—आई गेली कां आप्पासाहेबांची ?

**कृणाजी**—हो. कालच गेल्याना. ठरलच होतं. त्याना जायचच होतं. त्यांनीं एकदां ठरवलं जायचं कीं जायचं. बस्‌. मग. तिथें कांहीं होवो. परवाच जायचं म्हणत होत्या. आप्पासाहेबांनीं फारच हें केलं म्हणून राहून गेल्या. नाहींतर त्या सांगून राहिल्या होत्या ‘ बाबा तुझी बायको तूं ठरविनास; माला म्हातारीला कळतंय काय ? जुनी माणसं ती. निराळीच माणसं. आगदीं. अन्‌ त्यातून काकूंचा स्वभाव काय निराळाच. कांहीं पुसूं नका.

**नाना**—मघाशीं आप्पासाहेबांनीं स्वतःच फोन केलाना ?

**कृष्णाजी**—स्वतः ! त्यांच ते ठरलेलं आहे अगदीं. सगळीं काम स्वतः करून सोडायची. गडी माणसं दहा असेनात हाताखालीं. स्वत: सगळं करायचं. नेहमीचच आहे. आजचच आहे असं नाहीं. सवईच तशी ना ? प्रत्येक कामांत आपुण लक्ष घालायचं. बर वाटतयं कुठं त्यावांचून ? लहानपणापासूनच तसं.

**नाना**—नाहीं. त्यानीं कळवलं मुलगी पसंत नाहीं म्हणून.

**कृष्णाजी**—कुणी ? मुलगी पसंत नाहीं ? कुणी कळिवलं मुलगी पसंत नाहीं म्हणून ?

**नाना**—कुणी ते नाहीं सांगतां येत माला. पण झालं काय. ते आमच्या सुमाला घेऊन गेले. अन् मग त्यांची आई गेल्यावर थोड्या वेळांनीं परत पोचवली तिला त्यांनी. अन् तेव्हां तिच्याजवळ सांगून ठेवलं. म्हणले मी फोनवरून कळवतो नानासाहेबाना. आम्ही वाट पाहिली त्याप्रमाणें. बराच वेळ झाला फोन येईना म्हणून विचारलं शेवटीं. तेव्हां कोण बोललं कुणास ठाऊक. पण बहुतेक त्यांची बहीण असावी.

**कृष्णाजी**—छेः छेः त्यांची बहीण येतिच कुठून आत्तां इथें !

**नाना**—मग दुसरं कुणी असेल... मी तितकं विचारलं नाहीं.

**कृष्णाजी**—नाहीं. पण बहीण नाहींच. त्यांची बहीण असती तिकडं... लांब.कुठं ? ते आपलं. हां रावळपिंडीला. सरकारी डाक्तर आहेत जावईबापू. केवढं जंगी प्रस्थ आहे ते. दहा गडी आहेत. अन् तीन मोलकरणी. अन् दोन कारकून शिवाय ठेवून ठेवले आहेत.

**नाना**—नाहीं मग बहीण नसेल. दुसरं कुणी असेल. त्या म्हणाल्या ते कांहीं घरांत नाहींत. पण त्यांनी त्यांच्याजवळ सांगितलं होत वाटतं, बोलणं झालं होतं घरांत त्यांचं. त्यावरून मुलगी कांहीं पसंत नाही त्यांना असं...

**कृष्णाजी**—नाहीं नाहीं. नाहीं स्वतः आप्पासाहेबांनीं फोनांतून सांगितलं ना ! मी होतो तिथं.

**नाना**—अन् त्यांनींच सांगितलं ते घरीं नाहींत म्हणून ?

**कृष्णाजी**—नाहीं नाहीं, नाहीं. असं कसं सांगतील ते? त्यांनीं तर मुलगी पसंत म्हणन कळिवलं.

**नाना**—पसंत आहे ?

**कृष्णाजी**—पसंत आहे मुलगी.

**नाना**—मग त्याच्या आईला नापसंत झाली काय ?

**कृष्णाजी**—काकूंना ? वा. काय हें बोलणं ! पन्नास वेळा बजावलं ना त्यांनीं, आम्ही सांगूं नये इतक्यांतच हें...पण आपलं सांगतों. दहा वेळा

बजावून बजावून सांगितलं त्यांनीं, म्हणे लक्ष्मी चालत आली आहे तर तिला घालवूं नकोस म्हणे. गाडींत बसल्यावर सुद्धां...

**नाना**—मग पसंत नाहीं कुणाला ? वडलांच कांहीं त्यांच्या ? नाही म्हणून कसं फोनमधून कळवलं मगाशीं !

**कृष्णाजी**—नाहीं. नाहीं. वडील या भानगडींत मुळींच पडायचे नाहींत. मग बोलणं स्वतः आप्पासाहेब कशाला करतील ? फोनांत ते स्वतः बोलले. आपलं ऐकायला चुकलं असल. मी होतो ना तिथं. अन् त्यांच तुमचं कांहीं बोलणं झालं वाटतं. ते नाहीं माला ऐकायला आलं. पण माला सांगितलं त्यांनीं. म्हणे कांहीं तरी घोटाळा आहे. तर म्हणे जाऊन तेवढा खुलासा करून या म्हणे तुम्ही.

**नाना**—मग चमत्कार आहे मोठा.

**कृष्णाजी**—अहो त्या फोनावर जाऊं नका तुम्ही.यंत्रच ना ते कांहीं केलं तरी ? समक्ष गांठ ध्यावी तें खरं. यंत्र ते कांहीं झालं तरी यंत्रच.

**नाना**—बरं. जाऊं द्या. मी कांहीं म्हणत नाहीं आतां. मग मुलगी पसंत आहे ना ?

**कृष्णाजी**—मग काय सांगून राहिलो आहे ? अहो कोण नापसंत करील अशा लक्ष्मीला. माला सांगा...कोण...

**नाना**—सगळ्यांना पसंत आहे ? आईला ? त्यांना स्वतःला ?

**कृष्णाजी**—त्यांना स्वतःला ? तें कशाला विचारायला पायजे ? ती काळजीच सोडा तुम्ही. ( तेथें उभे राहाणें चमत्कारिक वाटल्यामुळें सुमन आंत निघून जाते. ) नापसंत होती कशी ? तुम्ही ती काळजीच सोडा.

**नाना**—काळजीचा प्रश्न नाहीं हो. आम्हाला तरी काय ? सगळ्यांच्या पसंतीनी झालं म्हणजे मागून हें नको व्हायला. बर. मग आतां उद्यां....

**कृष्णाजी**—हॉ. त्याच्यासाठींच तर आलो मी. ते सांगायलाच तर पाठि-वलं माला आप्पासाहेबांनीं. अन् सगळं बोलणं तेच करणार आहेत. आपल्याला सवड असली तर,.....नाहींतर ते येतील इकडं.

**नाना**—छे छे, त्यांनीं नाहीं इकडे यायचं. रीतीला सोडून मी वागायचा नाहीं. आमच काम आहे ते. मीच येईन. आप्पासाहेब घरीं केव्हां असतील तेवढं सांगून ठेवा, म्हणजे झालं. मी येईन. बोलण करून टाकू.

**कृष्णाजी**—ते होईल. त्यांत कांहीं नाहीं. बोलण्याबिलण्याच्या भानगडी फारशा व्हायच्याच नाहींत.

**नाना**—तें समजलं, पण एकदां व्हायला पाहिजे ना केव्हां तरी ? अरे गेनू, ए. ( थोडे थांबून ) सुमाताई ( सुमन येते ) चहा आणा जा, केला नाहीं कां अजून ? ( ती जाते ) हं. भानगडी नसल्या तरी ठरवून टाकलेलं बरं.

**कृष्णाजी**—हो हो. रीतिप्रमाणं व्हायचं ते झालंच पायजे. मग असं केलं तर. आपणच यावं तिकडं एकदां. म्हंजे......ते आले असते इकडं, पण रीतिप्रमाणं व्हायचं म्हंजे आपणच तिकडं आलेलं बरं.

**नाना**—तेच म्हणतो ना मी. माझं कामच आहे तें.

**कृष्णाजी**—अस्सं ! तेंच माझं म्हणणं.

( गेनू चहा घेऊन येतो. सुमन एक कप नानासाहेबांच्या पुढं ठेवते व दुसरा कप गेनूला कृष्णाजीपंतांच्या पुढं ठेवावयास सांगते. तो ठेवून तो तसाच तेथे उभा राहातो. सुमन त्याला खुणेनें जावयास सांगते. तो आं करून विचारतो. मघासारखे पुन्हां होऊं नये म्हणून ती त्याला खुणेनें पण जरा जास्त दरडावून सांगते. तो जातो )

**कृष्णाजी**—( चहा पितां पितां ) मग आपण आलात म्हंजे बरं होईल. बोलण्याबिलण्याच्या भानगडी जरी नसल्या तरी एकदां झालेलं बरं.

**नाना**—हो ना.

**कृष्णाजी**—ठरलेलं असलं म्हंजे मागून हें नको. तसं कांहीं हें नाहीं. पण ठरलेलं असावं ते बरं.

**नाना**—मग उद्यां चारच्या सुमाराला असतील कां घरीं आप्पासाहेब ?

**कृष्णाजी**—हो. सांगतों मी त्यांना. त्यांनीं सांगितलंच आहे तसं, म्हणे त्यांना केव्हां वेळ असल तेव्हां म्हणे मी घरीं राहीन म्हणे

**नाना**—माला वेळ वाटेल तेव्हां आहे. मी चार वाजतां येईन.

**कृष्णाजी**--अगदीं जरूर. (टेबलावर एक जाडा कागद पडलेला असतो तो उचलून ) हें काय आहे! आंकडे कसले आहेत हे !

**नाना**--बघूं. हं हं. हे नंबर आहेत. आपले टेलिफोनचे.

**कृष्णाजी**---अस्सं. तांबडी खूण आहे तो इथला वाटतं ? पांचशें सत्यात्तर. अस्सं. आपल्याला तर त्यांतून नीटसं बोलतांच येत नाहीं. कारणच पडत नाहीं. आमच्या तिकडं गांवाला फोन नाहींन् ढोन नाहीं. इथं आलो कधी म्हंजे पाहायचं. बरं मग उद्यां......पाहा एकदोन......हो चारच्या सुमाराला आपण आलात......सवड होईल ना आपल्याला ?

**नाना**—होईल ना. मी येतो चार वाजतां.

**कृष्णाजी**—हो. चार वाजतां या. कांहीं भानगडी नसल्या तरी आपलं ठरवून टाकलेलं बरं.

**नाना**—हो हो प्रश्नच नाहीं.

**कृष्णाजी**--म्हंजे कटकट नसती मागून मग उगीच. हेंच आम्हाला वाटंल नव्हतं न् तेंच झालं नाहीं. एकदां काय झालं...आमची तिकडची खानदेशांतली गोष्ट आहे. ते विद्याधरपंत मुजुमदार—माहीत असतील तुम्हाला, त्यांच्या मुलीच्या लग्नातली गोष्ट आहे. हे असंच. कुठे तिला दिली आहे पाहा. हां त्या लोहोकऱ्यांच्या नातवाला. कांहीं ठरवलं नाहीं कुणी, कांहीं नाहीं, दोघांनाही वाटलं कांहीं व्हायचं नाहीं. पण बिनसायचं असलं म्हंजे त्याला कांहीं लागत नाहीं पाहा. तेव्हां एकदां स्पष्टपणे झालेलं बरं.

**नाना**—हां तेंच म्हणतो मी.

**कृष्णाजी**—बरं मग येऊं आतां. आपण...

**नाना**—मी येतो अगदीं वेळेवर.

( कृष्णाजीपंत काठी घेऊन जोडाबिडा घालून निघतात. दाराशीं जाऊन. )

**कृष्णाजी**—बरं मग मी कांहीं आतां फिरून यायची जरूर नाहीं ?

**नाना**—छे: छे: आतां कशाला तसदी आपल्याला.

**कृष्णाजी**—नाहीं, आपलं विचारलं. पायजे तर सकाळी यऊन जाईन. नाहीं आलो तरी आपल्याला कांहीं वाटायच नाहीं हे खरं. पण असतात अशी माणसं.

**नानाजी**--हो. पुष्कळ.

**कृष्णा**—म्हणून आपलं विचारलं. एकदां काय झालं, माला वाटतं आप्पा साहेबांच्या थोरल्या बहिणीचं लग्न होतं. आं...हो. नमुताईच्या लग्नांतच. ती तिकडं रावळपिंडीला असती म्हणून सांगितलं ना तिच. आणि पहा मी असाच गेलो होतो सांगाय सवरायला कायसं....कुठे ? त्या व्याह्यांच्याकडे. तर मी असा गेलो आणि दुसऱ्या दिवशीं कांहीं गेलो नाहीं. मला काहीं मनांतच आलं नाहीं. आणि झालं. बिनसलं कीं तेवढयावरनं. आतां झालं पुढें ठीक सगळं ते निराळं. पण आपली गोष्ट सांगितली. बरं मग येऊं. आपण असे उन्हं खाली झाल्यावर......आणि हे पहा. अप्पा साहेब स्वतः पहाणार सगळं वडील तिकडे लक्षच घालणार नाहींत.---बरं. ( कृष्णाजीपंत जातात. नानासाहेब पोंचवायला जातात. सुमन दारांत जाते. गेनू लावणी गुणगुणत कपबशा न्यायला येतो. 'चला चलाग चलावो गवळणी मथुरेच्या बाजाराला जी ' नाना व सुमन परत येतांना पाहून गप्प होतो. व कपबशा उचलून घेऊन जातो. )

**नाना**—हं. मग काय सुमा ? ( तिचे गालगुचे धरून ) नशीब काढणार पोरी तूं. आं.

**सुमन**—आज नाना तुम्ही नुसतं दूध नाहीं प्यायचं, जेवलं पाहिजे थोडसं

**नाना**–ते कां ? तुझं लग्न ठरलं म्हणून ? आज दुपारीच मला जेवण जरा जास्त झालं होतं.

**सुमन**— ते कांहीं नाहीं आं. आज जेवलं पाहिजे.

**नाना**—बरं सांग पान वाढायला. पोरी, आहेस दोन दिवस तोंवर आग्रह करशील. उद्यां गेलीस आपल्या घरीं म्हणजे मग कोण म्हणणार आहे माला ?

( सुमन जाते) [ पडदा

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

(शारंगपाणी यांचें घर. एक खोली. पद्माकर पोषाख करून टेनिसची रॅकेट घेऊन खेळावयास जाण्याच्या तयारीत आहे. सुमति वाचीत बसली आहे.)

**पद्मा**—(रॅकेट सुमतीच्या डोक्यावर हलुच आपटून) ताईसाहेब आज आपण मॅच पाहाला येणार होतात ना ?

**सुमति**—खरंच कीं, झाली वेळ ? चल आलेच.

**पद्मा**—आंत कशाला जातेस ? पावडरबिवडर फासायचा बेत आहे वाटतं. आतां काय जरूर आहे त्याची ? पसंति बिसंती तर काल झाली सगळी !

**सुमति**—(पुन्हां खुर्चीवर जाऊन बसते) मी मुळीं येतच नाहीं.

**पद्मा**—अग नाहीं नाहीं. खरंच नाहीं. चल. मी उगीच आपलं गमतीनी म्हटलं. चल.

**सुमति**—(पुस्तकावरची दृष्टी न काढतां) मी आतां यायची नाहीं.

**पद्मा**—अग मी म्हणणार नाहीं पुन्हां. ॲहॅ ! फारच आहे आं तुझं हे. इतकी ग काय चिडतेस ?

**सुमति**— मी कांहीं चिडले नाहीं. पण मी कांहीं यायची नाहीं आतां.

(नानासाहेब येतात. सुमति उठून आतल्या दाराजवळ जाते. पद्माकर कपाळाला जरा आठ्या घालतो.)

**नाना**—(नमस्कार करून जरा पुढें येतात. पद्माकर बसा म्हणून म्हणतो)

**नाना**—आपण बाहेर निघाला वाटतं ?

**पद्मा**—हो. खेळायला निघालो आहे मी. आज मॅच आहे आमची.

**नाना**—तात्यासाहेब आहेत कां घरांत ?

**पद्मा**—नाहीं. तात्या अजून सोलापुराहून आलेच नाहींत.

**नाना**—सोलापूरला गेले आहेत हो? मी आलो होतो काल ठरल्याप्रमाणें.

**पद्मा**—काल ठरल्याप्रमाणें ? काय ठरलं होतं काल ?

**नाना**—काल आपल्या माणसाबरोबर चार वाजतां येईन म्हणून मी निरोप नव्हता कां धाडला ? का कळवलाच नाहीं त्यांनीं.

**पद्मा**—म्हणजे ? मी माणूस कधीं धाडला होतां ?

**नाना**—( खुर्चीवर मागे डोके टेकून तुळईकडे पाहूं लागतात. थोडा-वेळ थांबून मग काठी वगैरे उचलून ) बराय. मग येतो मी.

**पद्मा**—पण माला समजलं नाहीं कांहीं. मी माणूस धाडला होतां तुमच्याकडे काल ?

**नाना**—उगीच बोलणं वाढवण्यांत काय मतलब आहे ? त्यांत काय अर्थ आहे ? मुलगी नापसंत म्हणून कळवतां, पुन्हां बदलून पसंत म्हणून कळवतां, पुन्हां लगेच बदलायचं. व्यवहार नाहीं हा. नसली पसंत तर एकदम नाहीं म्हणायचंन् मोकळं व्हायचं.

**पद्मा**—अहो पण कुणी कळवलं हे ? पसंत आहे न् नापसंत आहे ?

**नाना**—काल फोन मधून प्रथम तुम्ही नाहीं कळवलें नापसंत आहे म्हणून ? तुम्ही म्हणजे तुमच्याकडून कुणी तरी कळवलं असलं पाहिजे. मागून जरा वेळ नाहीं गेला तो माणसाबरोबर कळवलं, पसंत आहे.

**पद्मा**—अहो पण तसं होईल कसं ? काल मी आलो तुमची मुलगी पाहयला तेव्हां तुम्ही घरी तरी होतात ? ( खुणेनें सुमतीला आंत जावयास सांगतो पण ती तिथेंच उभी राहाते )

**नाना**— मी घरीं नव्हतो हें कबूल आहे मला- पण त्याच्यासाठीं माला प्रायश्चित्त देतां कां काय हे ? अन मी घरीं नव्हतो म्हणून तुम्हाला एवढं अवघड वाटलं होतं तर तिला मग हिंडायला नेऊन तिच्याशीं गोडगोड बोलणीं कशाला केलीत ?

**पद्मा**—कुणी मी ? जुलूम झाला आतां. अहो मी आलों तेव्हां तुम्ही तर नव्हतांच घरीं, पण तुमची मुलगी पण घरीं नव्हती.

**नाना**—शाबास !

**पद्मा**—शाबास काय ? काळी कां गोरी कशी ती तुमची मुलगी मी पाहिली नाहीं अन् कळवीन कसा तुम्हांला पसंत आहे किंवा नापसंत आहे म्हणून ?

**नाना**—बरं. मग नाहीं कळवलत ना तुम्ही ? तुम्हांला आमची मुलगी भेटली नाहीं. तुम्ही फोन केला नाहींत. अन् काल मनुष्य पण धाडला नाहींत ! ठीक आहे. लवकरच सावध केलंत मला. येतो मी. (भरभर निघून जातात. )

**पद्मा**—मोठा चक्रमच दिसतो आहे म्हातारा. ( पुन्हां रॅकेट उचलतो )

**सुमति**—( पुढें येऊन ) काय दादासाहेब. काय भानगड आहे ही ?

**पद्मा**—भानगड कसली ? अग हेच ते नानासाहेब. ती मुलगी पाहायला गेलो होतो ना मी ? तिचे वडील. आपलं वाटेल तेच म्हणायला लागले.

**सुमति**—वाटेल ते काय म्हणाले रे ते ? तूंच कांहीं तरी घोटाळा केलेला दिसतो आहेस ? खरं सांग काय ते.

**पद्मा**—( तिला वेडावून ) खॅल काय शांग ? म्हणे तूंच घोटाळा केला आहेस.

**सुमति**—नाहींतर काय ? काल आम्हाला काय सांगितलंस ? आईला न् माला ? गबाळी आहे मुलगी, तिचा अवतार पाहूनच माझं मन फिरलं. अन् आतां त्यांना म्हणे काळी कां गोरी आहे तुमची मुलगी तीसुद्धां पाहिली नाहीं.

**प्रभाकर**—( आपण केलेला घोटाळा पाहून गांगरतो ) आं. काय? काय म्हणतोस ?

**सुमति**—काय म्हणतेस काय ? आतां लपवालपवी करून चालणार नाहीं.

**पद्मा**—अग जा. म्हणे लपवालपवी चालणार नाहीं. अन् तुला मी घरांत जा म्हणून सांगितलं तरी तूं कशाला उभी राहिली होतीस इथें ?

**सुमति**—( हंसून ) म्हणूनच तर उभी राहिलें इथें. दादासाहेबांनीं काय घोटाळा केला आहे तो नको माला पाह्यला ? त्यांच्या मुलीबरोबर मोटारीतून हिंडून गप्पा मारायला पाहिजेत काय ?

**पद्मा**—हो हो पाहिजेत !

**सुमति**—मग त्याच्याबद्दल मी कुठें काय म्हणते आहे ? आम्हाला पसंत नाहीं म्हणून कशाला सांगितलंस ? काल मी कळवलं तरी नसत त्यांना, तुला मुलगी पसंत नाहीं म्हणून.

**पद्मा**—म्हणजे ? तूं कळवलंस त्यांना,मुलगी माला पसंत नाहीं म्हणून ? तुला कुणी उद्योग सांगितला होता ?

**सुमति**—कां फार सुरेख होती कारे ती मुलगी. आतां ती येणार नसेल मोटारींतून तुझ्याबरोबर ? मग माला खोटं कशाला सांगितलंस ? बरं झालं. बरं प्रायश्चित्त मिळालं. म्हणे तुला कुणी उद्योग सांगितला होता, अरे माला सांगायला कशाला पाहिजे ? मी एवढी पाठची बहीण तुझी. इकांनीं माला छळून तूं आपलं प्रेम जसं दाखवतोस, तसं माला नको दाखवायला ! काल माला छळून छळून आपण गेलात बाहेर, अन् जरा वेळांनीं फोन आला त्यांचा. आपण तिथें सांगून ठेवलं होतंत वाटतं फोन करून कळवीन म्हणून. त्यामुळें त्यानें विचारलं. तेव्हां मग मी सांगितलं. म्हटलं तो कांहीं घरांत नाहीं, पण मुलगी पसंत नाहीं, म्हणून म्हणत होता तो. मगाशीं तें म्हणत होते तुम्ही नापसंत म्हणून कळवलं म्हणून, ते खोटं नव्हतं कांहीं. मीच कळवलं होतं.

**पद्मा**—अग पण तूं माहिती नाहीं म्हणून कां नाहीं कळवलंस ?

**सुमति**—आतां माला काय माहीत तुझा हा गोंधळ आहे म्हणून. आपल्या बहिणीला विश्वासांत घेऊन जर कळवलं असतस कीं गेलों होतों त्या मुलीबरोबर, आवडली आहे ती माला तर......

**पद्मा**—अग पण सुमे खोटं आहे सगळं तें. खरंच मी गेलों नव्हतों.

**सुमति**—अजून तुझं आहेच कां ? ए आई, आईय ! हा बघ दादांनी काय घोटाळा केला आहे तो. इकडे ये. ( कमळाबाई येतात. ) अग त्यांची मुलगी याला आवडली आहे.

**पद्मा**—अग आई...

**सुमति**—दादा आतां मधें बोलूं नकोस आं. बरं कां आई, ती मुलगी याला आवडली आहे. हा तिच्याबरोबर फिरायला सुद्धां गेला होता. काल

आपल्याला यांनीं सांगितलन् की ती मुलगी माला पसंत नाहीं न् गबाळी आहे. अन् आतां ते आले होते, त्यांना म्हणतो तुमची मुलगी घरींच नव्हती मी पाहायला आलो तेव्हां. काळीं कां गोरी कशी ती मी पाहिली सुद्धां नाहीं.

**कमळा**---होयरे पद्मा.

**पद्मा**---अग आई. तूं कांहीं ऐकू नको तिचं, ती बावळट आहे.

**सुमति**---हो हो. आतां मी बावळट कां ?

**कमळा**---पण पद्मा ? आवडली होती तुला तर तसं सांगायला काय झालं होतं ?

**पद्मा**---अग पण आई खोटं आहे ते सगळं. तो म्हातारा काय वाटेल ते बोलत होता. खरंच ती घरांत नव्हती मी गेलों तेव्हां.

**कमळा**---मग काल गबाळी आहे म्हणून कसंरे सांगितलंस ?

**पद्मा**---खरं सांगू कां आई, काल मी खोटं सांगितलं होतं.

**सुमति**---काल खोटं सांगितलं होतं कां ? आतां हा वाटेल तें सांगेल.

**कमळा**---असं काय रे करावं पद्मा ! अन् आतां हा घरीं आल्यावर कळलं म्हणजे बोलणीं नाही बसायची तुला ?

**सुमति**---मी सांगेनच तात्यांना. केवढा गृहस्थ तो.अन् आई त्यांनाच हा खोटं करायला लागला हो. अन् आई माझ्यावर काल काय आणल होतन्. कुणी नुसता फोन केला तर त्याच्यावरून माला खोटी ठरवलीन् अन् आतां आपण.

**पद्मा**---आई मी संध्याकाळी सांगेन तुला सगळं. आता आहे मॅच आमची. हिंचं कांहीं मनांत धरूं नकोस तूं.

**कमळा**---पण पहा हो नीट, गांवाहून कुणी घरी यायच्या आंत सगळं मिटवून टाक. नाहींतर कळलं, असा तूं कांहीं गोंधळ केला आहेस म्हणून तर मुळींच खपायचं नाहीं अन् मग रागावून घेशील.

**पद्मा**---नाहीं आहे आई कांहीं गोंधळ.

**सुमति**---बघ हो आई. बघ कबूल करतो आहे कां ?

**पद्मा**—तूं गप्प बैस पाहूं आतां. मी जातो बरं कां आई. संध्याकाळीं सगळं सांगतो तुला. ( जातो. )

---

## प्रवेश दुसरा

( प्रभाकराची राहाण्याची जागा. प्रभाकर अस्वस्थ होऊन फेऱ्या घालीत आहे. मधून मधून तो हातांतल्या घड्याळाकडे पाहातो. )

**प्रभा**—काय गोंधळ आहे बुवा हा ? कृष्णाजीपंत. ( ते येतात ) चार वाजतां ते येणार आहेत म्हणून म्हणालांत ना तुम्ही काल ? ते नानासाहेब ?

**कृष्णाजी**—हो.

**प्रभा**—मग अजून कसे नाहीं आले ? आतां तर पांच वाजायला आले. तुम्ही कांहीं घोंटाळा नाहींना केला ?

**कृष्णाजी**—छेः मी काय घोटाळा करणार ? दोनदां दोनदां सांगून सोडलं मी त्यांना. सांगितलं म्हटलं अप्पासाहेब घरीं आहेत चार वाजतां. ते पण म्हणाले, चार वाजतां मी येतो नक्की म्हणून.

**प्रभा**—मग अजून कसे नाहीं आले ?

**कृष्णाजी**—आतां काय झालं भगवान् जाणे.

**प्रभा**—तुम्हींच नाहींतर कांहीं घोटाळा केला असेल. आजच्या ऐवजीं उद्यां म्हणाला असाल. चाराचे सहा केले असतील.

**कृष्णाजी**—नाहीं नाहीं नाहीं. असं कसं होईल. लग्नाच्या गोष्टी आहेत या. इतर एक कांहीं असो. पण या लग्नाच्या गोष्टी आहेत. असं कसं होईल ?

**प्रभा**—होईल कसं तें मी काय सांगूं ? झालेलं दिसताहे. नाहीं तर मग ते अजून कसे आले नाहींत ?

**कृष्णाजी**—काल एक घोंटाळा झाला होता तिथें...मग त्याच्यामुळें...

**प्रभा**—कसला घोटाळा ? आं ? निघूं द्या बाहेर एकेक. तरी मी म्हटलंच तुम्ही घोटाळा केला असलाच पाहिजे.

**कृष्णाजी**—छेः छेः माझा नव्हे, त्यांचाच. म्हणजे असं झालं–मात्र मला

वाटत नाहीं हो ते त्याच्यामुळें एवढं करतील असं. पण अजून आले नाहींत त्यावरून वाटतं. त्याला कांहीं मोठंस महत्त्व आहे असं नाहीं. पुष्कळ वेळां होतं असं. आपली चूक होती ऐकण्यांत. त्या विजापुऱ्यांच्या छबीच्या लग्नांत नाहीं कां? ते...

**प्रभा**—पण काल घोंटाळा काय झाला?

**कृष्णाजी**—काल मी गेलों, बसलों, इकडे तिकडे झालं. मग ते काय म्हणाले माला! मुलगी म्हणे नापसंत आहे म्हणून कळिवलंच कसं म्हणे तुम्ही?

**प्रभा**—नापसंत? असं कसं वाटलं त्यांना?

**कृष्णाजी**—कुणी तरी फोनांतून कळिवलं म्हणे त्यांना कीं, आप्पासाहेब कांहीं घरांत नाहींत, पण त्यांना मुलगी नापसंत आहे.

**प्रभा**—शाबास! पण मग कुणी कळवलं म्हणून विचारलं नसेलच तुम्ही? नुसती त्या विजापुऱ्यांच्या छबीची गोष्ट सांगितली असेल.

**कृष्णाजी**— नाहीं मी विचारलं त्यांना.

**प्रभा**—पण छबीची गोष्ट सांगितलीच असेल आधीं!

**कृष्णाजी**—हं......नाहीं.

**प्रभा**—नशीब त्यांच! बरं मग काय म्हणाले ते?

**कृष्णाजी**—ते म्हणले की कुणी सांगितला फोन ते माला नक्की नाहीं सांगतां येणार पण, बहुत करून त्यांची बहीण असावी म्हणे.

**प्रभा**—बहीण?

**कृष्णाजी**—हो. मी सांगितलं त्यांना. म्हटलं आप्पासाहेबांची बहीण कांहीं इथं नाहीं. ती असते तिकडं रावळींपडीला. तरी पण त्यांच्या मनाचं समाधान कांहीं झालेलं दिसलं नाहीं.

**प्रभा**—हा काय गोंधळ आहे? (थोडावेळ विचार करून) मग चपलाताईनीं तर नाहीना कांहीं वात्रटपणा केला?

**कृष्णाजी**—त्या केव्हां आल्या होत्या इथ?

**प्रभा**—काल नव्हती कां मामीन् ती आली! सुमाताईना मी पोचवून घरी आलों. तेव्हां नव्हत्या आल्या दोघी? मी सांगितलं तिला, त्याच्यावर

म्हणली सुद्धां ती. माला म्हणली दाखव एकदा वहिनी. हां तिचंच हें काम असेल. कारण ती मामीला म्हणतच होती. म्हणाली आई, आपण इथें असून आपल्याला न दाखवतांच आप्पांनीं मुलगी पसंत केलीन्. अन् म्हणाली मी आप्पांची गंमत करीन एखाद दिवशीं. तितक्यांत मी गेलो खाली. तेवढ्यांत माझी फजिती करण्यासाठीं तिनी फोन करून हें सांगितलं असलं पाहिजे. तिच्याशिवाय दुसऱ्या कुणाचंच काम नाहीं हे. थांबा आतां आल्यावर तिची खरड काढतो चांगली.

**कृष्णाजी**—पण नानासाहेब म्हणाले होते मात्र कीं चार वाजतां नक्की येतो म्हणून.

**प्रभा**—अहो पण म्हणजे काय झालं ? आपण त्यांची थट्टा केल्या सारंखंच नाहीं कां झाल ! काय वाटलं असेल त्यांना ? एकदां पसंत, एकदां नापसंत. आपली किंमत काय राहिली अशांनीं. इतका आचरटपणा चपलाताई करील असं नव्हतं माला वाटलं ! ( जरा सचिंत बसतो ) आतां एकदां जाऊन यायला पाहिजे तिकडे. नाहीं तर फोन करून तरी विचारलं पाहिजे. पण हें अगदींच वाईट झालं मात्र. त्यांना काय वाटलं असेल ?

**कृष्णाजी**—हो, हे काय ? वाटायचंच. मोठी माणसं आहेत तीं. बरं झालं त्यांनीं सांगून सोडलं म्हणून. नाहींतर एखादा आपला मनांत ठेवायचा. अन् म्हणायचा, फाजील लोक आहेत. त्या मार्तंडराव पानशांच्या लग्नांत असंच झालं ना. काय झालं, त्यांच्या व्याह्यांनीं यांच्या कारकुनाजवळ दीडहजार रुपये देऊन दिले होते. अन् यांना कांहीं तें माहीत नाहीं. अन् यांनीं पुन्हां मागणी केली पैशाची. अन् मग मोठं हेंच झालं ते अगदीं. त्यांनी एकदम पावतीच दाखविली कारकुनाची आणि मार्तंडरावांना अगदीं तोंडांत मारल्यासारखं झालं......माला वाटतं आतां असं करावं.

**प्रभा**—काय ?

**कृष्णाजी**—आपण एकदां समक्ष जाऊन यावं, नाहींतर फोनांतून तरी विचारून पाहावं.

**प्रभा**—हं. फोन करून पाहातो मी, नाही तर मग जाऊनच येईन. ( फोन असलेल्या टेबलाजवळ जातो. ) इथला नंबर टिपलेला कागद काय

झाला ? कृष्णाजीपंत,पूर्वी कागद हरवल्याची एखादी गोष्ट मुळींच न सांगतां तो कागद पहा बरं तेवढा. तो नंबराचा कागद.

**कृष्णाजी**—पाचशे सत्याहत्तर नंबर आहे त्याचा.

**प्रभा**—पाचशे सत्याहत्तर ? छेः चुकताय कांहीं तरी तुम्ही. काल माला वाटतं मी निराळ्या नंबरावर फोन केला होता.

**कृष्णाजी**—नाही. नाही. नाही. मी काल पाहून आलो ना नंबर त्यांचा. तिथं सहज टेबलावर कागद दिसला, म्हणून विचारलं मी त्याना. तांबडी खूण होती त्यांच्या नंबरावर

**प्रभा**—नक्की आठवतं आहे तुम्हाला ? नाहींतर पाहा. दुसऱ्याच कुठल्या नंबरावर फोन करीन मी अन् त्यांना सांगेन लग्न ठरवायला या म्हणून. अन् मग तुम्हाला एक गोष्ट होईल सांगायला..

**कृष्णाजी**—छेः छेः

**प्रभा**—अहो तसं नाहीं. चपलाताईंनीं तोंडघशी पाडलंच आहे. पुन्हां नको आतां. तुम्ही आपला तो कागदच आणा कुठाय तो.

**कृष्णाजी**—(इकडे तिकडे धुंडाळतात) कागद नाहीं कुठें दिसत. मी इथेंच ठिऊन ठेवला होता. पण फोनाचा नंबर मला नक्की आठवतो आहे. पांचशे सत्याहत्तरच आहे.

**प्रभा**—बर. ( त्या नंबरावर फोन करतो ) हो. कोण आहे ? मी प्रभाकर. तुम्हीच आहांत कां सुमाताई, छान,

**कृष्णाजी**—आला ना तोच नंबर.

**प्रभा**—( तिकडे लक्ष न देतां ) बरं. नानासाहेब आहेत कां घरांत ? बाहेर गेले ? बरं हे पहा. काल आमचे कृष्णाजीपंत आले होते ना तिकडे ? कारकून आमचे. हं आले होते ना ते ? हं मग तेव्हां नानासाहेबांनीं चार वाजतां इकडे यायचं असं बोलणं झालं होतं. हं. चार वाजतां. मग अजून कसें आले नाहींत ते. तुम्ही होतांच ना ? मग काय तर. मग आतां तर पांच वाजायला आले. अन् अजून कसें आले नाहींत ते ? किती. पावणे चारला, मग अजून कसें नाहीं आले ? परत घरीं आले ? बर, बर,

मग म्हणत काय होते ? कां ? तसं नव्हे ? पण संतापायचं काय कारण झालं ? तुम्ही विचारलंच नाहीं ? बरं. बरं असं पहा, आतां वेळ आहे ना तुम्हाला ? मग इकडे येतां तुम्ही ? इश्श्य करायला काय झालं ? मग नसेतात ? मी राग घालवीन त्यांचा. याच तुम्ही. मी गाडी पाठवतों. नाहीं तर मग माला यावं लागेल तिथें. बरं आईला विचारून या. कृष्णाजीपंत, त्रिंबकला सांगा. गाडी घेऊन जा म्हणावं. अगदीं नीघ म्हणावं आतां. (ते जातात) हं. मिळाली कां परवानगी ? एवढंच ना ? सातच्या आंतच ना ? मी साडेसहालासुद्धां पोचवीन तुम्हाला. ती काळजी नका करूं तुम्ही. गाडी पाठवलीच आहे मी. आतां पुन्हां इश्श बिश्श करूं नका हो ? ( कृष्णाजीपंत येतात ) सांगितलंत कां ? आतां वासुदेवाला चहा वगैरे करायला सांगा. ( फोन खाली ठेवून इकडे तिकडे येरझारा घालतो. कृष्णाजीपंत परत येतात. ) आईचं पोंचल्याचं पत्र कसं नाहीं आलं आज. नाहीं खरंच. आई कालच गेली नाहीं कां ? उगीचच मला बरेच दिवस गेल्यासारखं वाटताहे. बर कृष्णाजीपंत आपल्याला उद्यां परत जायचं आहे आतां. बिलं वगैरे सगळीं मागवून घेऊन चुकतीं करून टाका. नाहीं तर गेल्या खेपेसारखं राहील कुणाचं. त्या आल्याच मला वाटतं. चहा झाला का बघा. अन् त्रिंबकला सांगा गाडी म्हणावं आंत घेऊं नको. माला जायचच आहे बाहेर लगेच. ( कृष्णाजीपंत जातात. सुमन येते ). या, म्हटलं येतां कां नाहीं. बसा. त्या खुर्चीवर बसा ना. हंः काय झालं म्हणालांत. कां नाहीं आले नानासाहेब.

**सुमन**—( त्यांच्याकडे न पाहता बोलते ) कां नाहीं आले ते माला नाहीं माहिती. चार वाजतां इकडे यायचं म्हणून बाहेर पडले, अन् साडेचारलाच परत आले. आले ते भारीच संतापले होते ?

**प्रभा**—तेंच तर मी विचारतो आहे. संतापले कां होते ?

**सुमन**—तें नाहीं माला समजलं. माझा कांहीं धीर झाला नाहीं विचारायचा. आमच्या गड्याला—त्या गेनूला बोलले पुष्कळ. अन् पाचदहा मिनिट बसले न् पुन्हां बाहेर गेले. मी म्हटलं इथें कांहीं झालं वाटतं.

**प्रभा**—छे ः इथें ते आलेच नाहींत मुळीं. बरं ते जाऊं द्या. कां रागा-

वले होते ते कळेल केव्हां तरी. पण आतां यांत कांहीं भानगड नाहीं येवढं तर नक्की ना ?

**सुमन**---कसली ?

**प्रभा**---म्हणजे ऽ ऽ नानांचा कांहीं विरोध नाहींना आपल्या लग्नाला ?

**सुमन**-छेः

**प्रभा**---मातुश्रींचं कांहीं म्हणणं...? नाहीं....मग आतां-आतां तुम्हीं राहिलात. तुमचा कांहीं विरोध नाहींना ? सांगा. सकोच कसला आला आहे त्यांत ? तुम्हाला पसंत आहेना ?......काय सुमाताई ?

**सुमन**---माला नाहीं माहिती ? (उजव्या खांद्यांवरचा पदर दातांत धरते.)

**प्रभा**---तुम्हांलाच माहीत नाहीं ! अस कसं होईल ? नाहीं तर तुम्हीच जर सांगतलं असलं कीं आपल्याला हे स्थळ पसंत नाहीं म्हणून.

**सुमन**---मी मुळीच सांगितलं नाहीं तसं.

**प्रभा**---मग हरकत नाहीं. मग कांहीं काळजी नाहीं माला. आतां आपण असं करूं चहा घेऊन मग कालच्यासारखेच हिंडायला जाऊं.

**सुमन**-चहा नको माला.

**प्रभा**--कां ? चहा घेत नाहीं तुम्हीं कधीं ? तसं नाहीं ना ? मग काय तर ? कृष्णाजीपंत चहा झाला कां पहा बरं. ( कृष्णाजीपंत चहा व आणखी कांहीं खाद्य बश्यांत घेऊन येतात. प्रभाकर सुमनला घ्यावयास सांगतो, ती चमचा हातांत घेऊन अत्यंत मंदगतीनें जवळ जवळ न खाल्याइतकेंच खाते ) काल काय मुलाला मुलगी पसंत नाहीं म्हणून कळवलं तुम्हांला कुणी ?

**सुमन**--हो.

**प्रभा**---आमच्या चपलाताईची-माझी एक मामेबहीण आहे चपला म्हणून. अतिशय वात्रट आहे. तिनीं केलेलं दिसताय हे. तुम्ही सांगा नानासाहेबांना. मी सांगेनच. पण तुम्ही पण सांगा. त्यांना फार राग आला असेल काल ? हो ना ?

**सुमन**---थोडेसे रागावले होते.

**प्रभा**––अन् तुम्ही ? मुलगी नापसंत आहे असं कळल्यावर तुम्हाला काय वाटलं ?

**सुमन**––माला नाहीं सांगतां येत.

**प्रभा**––असं कसं होईल ? बरं तुम्ही सांगत नसाल. आतां आपण फिरायला जाऊं. मी कपडे करून येतो. अन् मग जाऊं तिकडे सोनदेवीच्या धरणाकडे.

**सुमन**––तिकडे नको

**प्रभा**––कां ?

**सुमन**––नको.

**प्रभा**––कां पण ? किती सुरेख हवा असते तिकडे अन् फारच चांगली जागा आहे ती.

**सुमन**––पण तिकडे नको. तिकडे माझ्या मैत्रिणी येतात सगळ्या.

**प्रभा**––मग बिघडलं काय ? माझी ओळख करून द्या त्यांच्यांशीं.

**सुमन**––नको नको. तिकडे नकोच. मग मी आपली घरींच जातें.

**प्रभा**––अरे बापरे. इतका तीव्र निषेध असला तर माझा कांहीं आग्रह नाही. दुसरीकडे जाऊं. कुठें जायचं मग ?

**सुमन**––दुसरं कुठेंही.

**प्रभा**––बरं बसा. मी आलोच. ( जातो )

**कृष्णाजी**––नानासाहेब यायचे होते. मग कां नाहीं आले ?

**सुमन**––काय जण बाई.

**कृष्णाजी**––पण म्हणजे माझ्याकडून सांगण्यात कांहीं घोटाळा नाहीं ना झाला ? आप्पासाहेबांना वाटतय मीच घोटाळा केला कांहीं तरी. त्यांना आपलं सांगून सोडा. माझ्याकडे कांहीं नाहीं म्हणून. नाहीतर रागवायचे एखादवेळीं. मागं एकदां झालं ना असंच. यांच्याच थोरल्या भावाचं लग्न होतं. अन् मी असाच गेलो होतो कांहीं सामान घेऊन. अन् गेलो अन् ते सामान त्यांच्याकडच्या मंडळींच्या जवळ दिऊन दिलं. अन् काकू म्हणत तुम्ही दिलंच नाहीं, अन् काय रागावल्या होत्या माझ्यावर. तस व्हायचं नाहीं

तर. पुढं आपलं ते सामान सापडलं तें निराळं. बरं (जांभई देतो.) हरी हरी हरी ! जगदब, जगदंब ! तुम्ही कुठं कालेजात असतां वाटतं.

**सुमन**—हो.

**कृष्णाजी**—कुठे पुण्याला ?

**सुमन**—नाहीं मुंबईला.

**कृष्णाजी**—हल्लीं काय मुलगे न् मुली एका वर्गांतच बसतात ना तिथें?

**सुमन**—हो.

**कृष्णाजी**—हं. मुली तुमच्याएवढयाच असतील सगळ्या? लग्न झालेल्या असतात कां सगळ्या ?

**सुमन**—छे. कुणीच नसतात.

**कृष्णाजी**—मग? सगळ्या कोवारणीच कां? इतक्या मोठ्या झाल्या तरी? हं. असो. काळ निराळा आहे. सध्यां रजा आहे तुम्हाला ?

**सुमन**—नाहीं. आई जरा आजारी होती म्हणून आले होते.

**कृष्णाजी**—अस्सं...आतां बरं आहे कां ?

**सुमन**—हो.

**कृष्णाजी**—त्या आमच्या देशमुखांची यमू आहे कां तुमच्या कालेजांत?

**सुमन**—कोण ? नाहीं बाई. माला नाहीं माहीत.

**कृष्णाजी**—मुंबईंत पुष्कळ कॉलेज आहेत म्हणा. तिथें कशाला कुणाचा पत्ता लागतो आहे. एकदां काय झालं... (प्रभाकर येतो)

**प्रभा**—काय झालं.

**कृष्णाजी**—अं हं. आपलं सांगत होतो.

**प्रभा**—सांगाना. नाहीं तर मीच सांगतो. एकदां काय झालं माझ्याच लग्नांतली गोष्ट आहे आपली. मालान् सुमाताईंना जायचं होतं हिंडायला. अन् त्यामुळें कृष्णाजीपंतांची गोष्ट ऐकायला वेळच नाहीं मिळाला. चला. सुमाताई दोनचार गोष्टीं एवढयांत नवीन समजल्या असतील तुम्हाला!(सुमन हंसू दाबायचा प्रयत्न करून पदर तोंडाआड धरते. कृष्णाजीपंत जातात.) बरं आतां नानासाहेब घरीं केव्हां येतील ?

**सुमन**—–काय जणं

**प्रभा**—त्यांना हें सगळं सांगायला पाहिजे. चवकशी करायला पाहिजे कां आले नाहींत. काय झालं...

**सुमन**—–पण माला वाटतं...

**प्रभा**—–काय सांगाना. भारी बुवा संकोच करतां न् लाजतां तुम्ही.

**सुमन**—–तसं नाही कांहीं. पण माला वाटतं त्यांना कांहीं विचारूं नये. माला कळलं कां रागावले होते, काय झालं होतं, म्हणजे मींच मग सांगेन त्यांना.

**प्रभा**—–अन् मी मुळींच कांहीं यायची जरूर नाहीं म्हणतां ?

**सुमन**—–माला आपलं वाटतं. नाहीतर ते रागावले असले, न् तशांत बोलायला गेलं, म्हणजे आणखी जास्त कमीं बोलणं होईल अन् मग...

**प्रभा**—–ते मुलगीच देणार नाहींत माला म्हणतां ? होय.

**सु.न**—–तसं नाहीं कांहीं

**प्रभा**—समजलो. व्हायचंही एखाद वेळेस तसं. मग तुम्ही सांगतां तसं करूं. तुम्हाला कांहीं कळलं तर कळवा मात्र माला. मग उद्यां याल फिरून ?

**सुमन**–आमचा तो गेनू गडी आहे त्याला पाठवीन. पण तोंपर्यंत मात्र.

**प्रभा**—आलं ध्यानांत. मी भेटायचाही नाहीं न् बोलायचाही नाहीं. अन् भेटलेच तर....खरंच अन् बंधू भेटले तुमचे तरी त्यांना पण कांहीं...

**सुमन**—–दादा मुळी भेटायचाच नाहीं. तो नाहीच आहे इथें.

**प्रभा**—–असं होय. मग हरकत नाहीं. बरं चला आतां. आधींच उशीर झाला आहे. अन् तुम्हाला साताच्या आंत परत जायचं आहे. कां झाला उशीर तरी चालेल ?

**सुमन**—–नको. आई रागवेल.

**प्रभा**—एँः ! आई कशाला रागावते आहे ? अन् रागावली तर सांगा काहीं तरी.

**सुमन**—–नको तसं. साडेसाहाला जायचच घरीं.

**प्रभा**—–साताचे साडेसहा झालें कां ? सातच्या आंत मुळी परतच फिरणार नाहीं मी. ( दोघे जातात–पडदा )

## प्रवेश तिसरा

( रस्ता--प्रभाकर रस्त्यानें जात आहे. माघून टेनिसची रॅकेट घेऊन पद्माकर येतो )

**पद्मा**----अहो प्रभाकरपंत ...ओहो वा बरी गांठ पडली. मी आज येणारच होतो आपल्याकडे.

**प्रभा**---- वा मग बरंच झालं गांठ पडली तें. खेळून आला वाटतं आतां. आणि खरंच गांवाहून कधीं आला तुम्ही ?

**पद्मा**---- मीं ? मी कधीं गांवाला गेलों होतो ?

**प्रभा**----सुमाताई म्हणत होत्या. भगिनी तुमच्या. सुमनताई हो.

**पद्मा**---- सुमन नाहीं. सुमति नांव आहे तिचं ?

**प्रभा**----सुमति ? सुमन ऐकल्यासारखं वाटलं माला, त्यांच्या बोलण्यातही तसं होतं माला वाटतं.

**पद्मा**----नाहीं हो सुमति नांव आहे. म्हणजे आम्ही ठेवलेलं हो. आतां तुम्ही सुमन ठेवलं असलंत तर निराळं

**प्रभा** —येः ! अगदीं ओव्हर बाऊंडरी मारलींत बुवा. बरं पण कांहीं फारसा फरक नाहीं म्हणा. सुमन अन् सुमति. अर्थ एकच आहे.

**पद्मा**—- वा: ! अर्थ एकच असला म्हणून ? आमच्या सुमति ऐवजी सुमन म्हणून नांव असलेल्या दुसऱ्याच एखाद्या मुलीला पत्कराल कां तुम्ही!

**प्रभा**——तसं नव्हे हो. आपली गंमत सांगितली. दोघींचींही नांव सुमाताई आहेत म्हणुन म्हटलं आपलं.

**पद्मा**----हो पण काय म्हणालात तुम्हीं? मी गांवाला गेलो म्हणून सांगितलं तुम्हाला तिनी ? हां हां. अहो काल मी माझा तो विश्वनाथ म्हणून मित्र आहे त्याच्याकडें गेलो होतो. आगगाडीनीं गेलो म्हणून गांवाला गेला म्हणाली असेल. पण काय हो, परवा तुम्हीं खरंच आला होतां ना आमच्या इथें ? आमच्या ताईला पाह्यला ?

**प्रभा**——म्हणजे ? अजून संशय आहे काय तुम्हांला ?

**पद्मा**—संशय म्हणजे तसं नाहीं कांहीं. पण ताई दाद लागू देत नाहीं अगदीं. अगदीं नाहीं म्हणते निखालस.

**प्रभा**—ई, त्यांचा स्वभाव जरा आहेच जास्त हा.

**पद्मा**—अहो म्हणून काय झालं ! अगदी भेटलेंच नाहींत, आलेच नाहींत म्हणायचं म्हणजे काय ?

**प्रभा**—आतां हे जरा जास्त आहे एवढं खरं, पण तो स्वभावच तसा. आतां आज सुद्धा मी पाहिलं. माझ्याशीं बोलणं सुद्धां जितक्यास तितकं.

**पद्मा**—आज ? म्हणजे ! आज पुन्हां आला होतां काय तुम्ही ?

**प्रभा**—आज मीच त्यांना फोन करून तिकडे बोलावलं होतं.

**पद्मा**—आणि आली होती ती ?

**प्रभा**—हो. हा आतांच मी तिकडून येतो आहे. त्या तिकडे गेल्या न् मी इकडे आलों. येतांना पायींच आलों आम्हीं.

**पद्मा**—कहर झाला आतां. ती आजिबात भेटच झाली नाहीं म्हणते याचा अर्थ काय ?

**प्रभा**—सांगितलं ना, फारच लाजाळू स्वभाव आहे त्यांचा.

**पद्मा**—ही कसली कर्माची लाज ! लाजायचं लाजायचं म्हणजे काय ? त्याला कांहीं अर्थ आहे कां नाहीं ? थोडसं लाजावं मुलींनीं. मी कांहीं नाहीं म्हणत नाहीं. अन् चांगलंही दिसतं तें. पण हिच्या लाजण्याला कांहीं सीमाच नाहीं.

**प्रभा**—खरं आहे तुमचं म्हणणं. मालासुद्धां बरोबर वाटतं ते. पण उपाय काय त्याला ? आतां आज कदाचित् तुम्हांला सांगतील त्या.

**पद्मा**—न कां सांगे ना. मी आतां एका शब्दांनीं तिला विचारीत नाहीं. बसू दे लाजत. आम्हांला कांहीं आहे कां नाहीं ? प्रभाकरपंत आले आले होते कां ? नाहीं ? भेट झाली होती कां ? नाहीं. सगळं नाहीं नाहीं. ए:

**प्रभा**—फारच संतापलेले दिसतां तुम्ही.

**पद्मा**—संतापलो म्हणजे ! माला तर चीड आली आहे अगदीं.

**प्रभा**—असं चिडून कसं चालेल. बहीण आहे पाठची तुमची ती.

**पद्मा**—मग बहीण असली म्हणून ? तिला कांहींच अक्कल नसावी कां काय ? मी खरंच सांगतो तुम्हांला, मी कांहीं एक विचारणार नाहीं तिला आतां. वडील आले म्हणजे पाहातील काय ते.

**प्रभा**—आपले वडील गांवाला गेले आहेत वाटतं.

**पद्मा**—हो ना. काल तुम्हांला त्यांनीं बोलावलं अन् काल एकाएकीं त्यांना सोलापुराला जावं लागलं.

**प्रभा**—असं म्हणूनच आज आले नाहींत वाटतं ? ( इतक्यांत याबाबतींत तुम्ही कांहीं बोलूं नका म्हणून सुमननें सांगितल्याचें त्याला आठवतें. व तो एकदम विषय पालटतो. )

**पद्मा**—म्हणूनच काय ?

**प्रभा**—अं हं. दिसले नाहींत कालपासून कुठें म्हणून म्हटलं

**पद्मा**—नाहींतच इथें तर दिसणार कुठून ? तुम्ही आहात ना इथे कांहीं दिवस अजून.

**प्रभा**—मी उद्यां दुपारच्या गाडीनीं जाणार आहे. येणार आहे परत दोन चार दिवसांत. पण दोन तीन दिवस इथें नाहीं.

**पद्मा**—दोन तीन दिवसच ना ? मग हरकत नाहीं. वडील येतीलच तेवढ्यांत. बरं आहे. जातो. उशीर होईल आतां.

**प्रभा**—बरं. ( जातात )

---

# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

( धुळें—श्यामकान्ताचें घर. श्यामकांत कांहीं लिहीत बसला आहे. लिहिण्याचें साहित्य टेबलावर पसरलें आहे. मधून मधून तो पुस्तकें चाळतो. विचार करतो व लिहितो. प्रभाकर प्रवेश करतो. )

**प्रभा**—काय, लिखाण चाललं आहे वाटतं कांहीं नवीन !

**श्याम**—हो. नुकताच बसलों आहें.

**प्रभा**—काय चाललं आहे सध्यां !

**श्याम**—सायकॉलजीवर लिहितो आहे.

**प्रभा**—म्हणजे पुस्तकच लिहितां आहा कां......

**श्याम**—होऽतशा सारखंच. चांगलंस पुस्तकच नाहीं मराठींत.

**प्रभा**—सध्यां झाली आहेत ना माला वाटतं एक दोन.

**श्याम**—अहो कसलीं पुस्तकं ती. एका लेकाला तरी मानसशास्त्र म्हणजे काय तें समजलं असेल तर शपथ. इथलं चोर, तिथलं भाषांतर कर हा धंदा. एकांनीं तरी अभ्यास केला आहे कां !

**प्रभा**—खरंच तुम्ही कलकत्त्याला तुमचा तो निबंध पाठवला होता. त्याच काय झालं हो !

**श्याम**—हां हां ते. 'डॉक्ट्रिन ऑफ ब्लाइंड चॅन्स' कांहीं नाहीं मिळालं बक्षीस त्याला. अहो, ते तिथें कुणाला समजलं असेल कां नाही याचींच शंका आहे माला. इंग्लंडांतसुद्धां बाल्फोर यानी फक्त याच्याविरुद्ध लिहिलं आहे; अन् त्याची मोठी नावाजणी होते अगदीं. पण तुम्ही पाहा वाचून त्याचं. सगळी घरसोड. एक विधान लेकांनी ठामपणें मांडलं असेल तर शपथ. मग इथलें अरण्यपंडित काय करणार ते दिसतंच आहे. परत आला निबंध आम.ा पण कायहो तुम्ही पुण्याला गेला होता ना ? आला कधीं ?

**प्रभा**--आजच आलो.

**श्याम**--आजच ? काकू काल आल्या माला वाटतं. कांहीं लग्नाचं घाटत होतं म्हणाल्या त्या. मुलगी पाहिली म्हणे. जमलं का कांहीं

**प्रभा**--हो. बहुतेक.

**श्याम**--अरे वा, मग लग्न कुठं करणार ? इकडे कां तिकडेच.

**प्रभा**--तितकं नाहीं अजून ठरलं. त्यांचे वडील गेले आहेत गांवाला. ते आले म्हणचे मग ठरेल.

**श्याम**--इकडेच ठरवा.तिकडे कशाला आम्ही येतो आहो. कुठेशीं जमलं आहे ? काय नांव आहे आपल्या वधूचं !

**प्रभा**--ते एक शारंगपाणी म्हणून आहेत. त्यांची मुलगी आहे. सुमती.

**श्याम**--( एकदम चकित होतो ) कोण म्हणलात तात्यासाहेब शारंग पाणी ?

**प्रभा**--नानासाहेब शारंगपाणी माला वाटतं.

**श्याम**--नानासाहेब ? सुमती मुलीचं नांव म्हणाला । ?

**प्रभा**--हो. कां ओळखतां कां काय तुम्ही तिला ?

**श्याम**--( आपल्याच विचारांत गढून जातो. सुमतीनें त्याच्यावरचें आपलें प्रेम व्यक्त केलें होतें. त्यामुळें तिचें दुसऱ्याशीं लग्न ठरलेले ऐकून तो विषण्ण होतो. )

**प्रभा**--काय हो श्यामकान्त.

**श्याम**--आं, काय ?

**प्रभा**--ओळखतां तुम्ही तिला ?

**श्याम**--ओळखतो म्हणजे तशी कांहीं ही नाही...पण थांबा आं. ( उठून एका कपाटांत कांहीं धुंडाळतो. ) ते पद्माकर शारंगपाणी...

**प्रभा**--हो. ते बंधु त्यांचे.

**श्याम**--हो ना. हें पहा यांत फोटो आला आहे त्यांचा. ती नागपूर न् मुंबईमध्यें मॅच झाली ना? त्यांत त्यांनीं शंभर रन्स काढल्या होत्या. तेव्हां फोटो आला होता त्यांचा. यांना पाहिले आहेत तुम्ही ?

प्रभा—वा पाहिल म्हणजे काय ? कालच माला भेटले होते हे संध्या-काळीं. हे बंधु त्या मुलीचे.

श्याम—हिच्याशींच लग्न ठरलं आहे तुमचं ?

प्रभा—ठरलं आहे म्हणजे...अजून बोलणंबिलणं व्हायचं आहे शेवटचं. पण मी पाहून आलों. फिरायला गेलों होतों एकदोन दिवस आम्ही.

श्याम—सुमती न् तुम्ही ? मग तिची संमती आहे कां ?

प्रभा—हो. शंकाच नाहीं. विचारत नाहींत कधीं मुलींना असं. पण मी तेंसुद्धां विचारलं काल त्यांना.

श्याम—आणि तिनी सांगितलं हो म्हणून ?

प्रभा—हो. कां ?

श्याम—कां असं नाहीं. बऱ्याच धीट झाल्या आहेत म्हटलं मुली सध्याच्या.

प्रभा—छेः हो. कसल्या आल्या आहेत धीट. उगीच वाटतं आपल्याला. कॉलेजमध्यें कांहीं चार वाक्य पाठ केलेलीं म्हणत असतील धिटाईनीं. पण लग्नाची वेळ आली कीं सगळा धीटपणा मावळतो. तिच्या भावाची न् तुमची ओळख आहे काय ?

( श्यामकान्त अगदीं त्रस्त झालेला असल्यामुळें त्याचें इकडे लक्ष नसतें )

काय हो. तुमच्या लेखाचं भ्रमण फारच जोरांत चाललेलं दिसताहे तुमच्या डोक्यांत. बरं जातो मी आतां.

श्याम—छेः छेः भ्रमण कसलं ? जरा लवकर पुरं करायचं आहे, म्हणून आपलं...एरवीं तसं कांहीं हें नाहीं.

प्रभा—अहो पाहिजेच भ्रमण तसं. त्याशिवाय चांगली पुस्तकं व्हाय-चीच नाहींत. अन् तुमच्या सारख्यांचा वेळ आम्ही घेणं बरोबर नाहींच मुळीं. बरं आहे.

श्याम—वा. कांहीं तरीच बोलतां तुम्ही. पुनः या पण केव्हांतरी सवड काढून ? आत्तां जरा......

( प्रभाकर नमस्कार करून जातो. त्यानें बरोबर आणलेली पिशवी तेथेंच राहाते ).

**श्याम**---हं सुमतीबाई, बरंच लवकर प्रेम बदललं म्हणायचं तुमचं. तरीच परवा सिनेमाला चला म्हणत होतों तेव्हां आला नाहीं तुम्ही. हं आतां ठीक आहे. माला वाटलच त्या दिवशीं कांहीं तरी निराळं आहे म्हणून. पण म्हटलं उगीच तर्कट करण्यात काय अर्थ आहे ? पण ते खरंच ठरलं शेवटी. माझा फोटो मागून घेतलात, आपला मला दिलात. आणि दोन दिवसही त्याला झाले नसतील. अच्छा. बहोत अच्छा. ( पुन्हां लिहावयास बसतो. पुस्तकें चाळतो. पण थोड्यावेळानें पुन्हां पुस्तक फेकून देऊन उठतो ) हं. मग मी पण मोकळाच झालों म्हणायचा. मग आतां काय कुठलीही मुलगी पत्करायची. प्रेमबीम संपलच सगळं. खरंच सकाळीं ती मुलगी...हो फोटो पण आला आहे तिचा. ( कपाटांतून फोटो काढतो. ) सुमन मनोळीकर. काय हरकत आहे. पैसा तरी मिळेल पुष्कळसा. ( आडव्या खुर्चीवर तुळईकडे दृष्टी टाकून पडतो. नानासाहेब येतात. श्यामकान्त उठून त्यांचे स्वागत करतो. थोड्या वेळानें. )

**नाना**---मग काय ठरला आपला विचार ?

**श्याम**---माझी कांहीं हरकत नाहीं तशी.

**नाना**---मुलगी पसंत आहे ना आपल्यला ? नाहींतर एकदां पाहून...

**श्याम**---नको. तशी पाह्यची कांहीं जरूर नाहीं. फोटो आपण दिलाच आहे. पसंत आहे मुलगी माला.

**नाना**---मग निम्मं शिम्मं काम उरकलंच आहे. आतां आपली कोणी वडील माणसं......

**श्याम**---तसं कोणी नाहीं माला.

**नाना**---नाहीं आपलं देण्याघेण्याचं बोलणं करायला...

**श्याम**---पण तसं नाहींच कोणी. तुम्ही काय ते सांगा. माला पटलं तर हो म्हणेन; नाहींतर नाहीं म्हणेन.

**नाना**---तसा पटण्या न पटण्याचा प्रश्नच येणार नाहीं. मी कांहीं एवढ्या तेवढ्यासाठीं मागें पुढें पाहाणारा मनुष्य नाहीं. समजलं कीं नाहीं. ती काळजी तुम्ही करूंच नका. पण व्यवहार आहे हा. व्हायचं बोलणं तें चार लोकांसमक्ष

झालेलं बरं...असा भाग त्यांतला. नात्याचींच पाहिजेत असं नाहीं. आपले मित्र असतील, हे असतील त्यांना बोलवा. बसूं एक दिवस. ठरवून टाकूं.

श्याम—मग असं करूं. मीच तिकडे उद्यां येतो. मी दोनतीन मित्रांना घेऊनच येईन आपल्याकडे, म्हणजे झालं.

नाना—तरी हरकत नाहीं. मीच यायला पाहिजे. पण आपण येणारच असाल तर ठीकच आहे. मित्रांना मुलगी पण दाखवून टाकूं.

श्याम—छे छे: त्यासाठीं नाहीं कांहीं मी म्हटलं.

नाना—अहं अहं. तसं मी कुठें म्हणतो आहे. पण आपलं झालेलं बरं. मागून हा एक म्हणतो तो दुसरं म्हणतो असं नको. बरं. आपण काय पुस्तकं वगैरे लिहितां वाटतं ?

श्याम—लिहितो कांहीं. पण कुणाला किंमत आहे त्याची इथें ?

नाना—अहो तें चालायचंच. विद्वानांची किंमत जगाला नसतेंच नाहीं तरी. पण म्हणून ते कांहीं आपला उद्योग सोडीत नाहींत. नेहमींचच आहे ते. बरं मग येतो मी आतां. एक दोन दिवसांत आपण येतांच आहां.

श्याम—उद्यांच जमलं तर.

नाना—वा. फारच चांगलं. ( जातात. )

[ प्रभाकर प्रवेश करतो ]

प्रभा—माझी पिशवी मघाशीं येथें राहिली आहे कां हो ?

श्याम—तुमची ? हो आहे खरीच टेबलावर एक पिशवी. मघाशीं माझ्या ध्यानांत नाहीं आलं.

प्रभा—(टेबलावरील पिशवी उचलतो. तेथें त्याला सुमनचा श्यामकांतानें नुकताच ठेवलेला फोटो दिसतो.) हें काय ? हा कुणाचा फोटो ?

श्याम— ही मुलगी माला सांगून आली आहे.

प्रभा—ही ?

श्याम—हो आत्तांच तिचे वडील येऊन गेले.

प्रभा—इथें ?

श्याम—तुमचं काय मत आहे ? बरी आहे कां मुलगी ?-पाहा नीट

जरा. मी आलोंच जाऊन जरा. आमचा तो छापखान्यांतला मनुष्य खालीं आला आहे प्रुफं घेऊन. ( जातो )

**प्रभा**—हं. आमच्या चपलताईच्या पराक्रमाची फळं बरीच भोंवणार असं दिसताय. नानासाहेबांना सहन झालेला दिसत नाहीं तो अपमान अगदीं. बरोबरच आहे. कुणालाच सहन व्हायचा नाहीं. एकदां पसंत आहे म्हणायचं, एकदां नापसंत आहे. मीच जाऊन खुलासा करायला पाहिजे होता. सुमाताईचं ऐकायला नको होतं. पण नानासाहेब एकदम दुसरीकडे मुलगी सांगून जातील ही तरी कल्पना कुणाला होती ? पण आतां निदान उद्यांच्या उद्यां परत जाऊन प्रकरण मिटवून टाकलं पाहिजे. नाहींतर थोड्याशा चुकीसाठीं जन्मभर दुःख करीत बसायची पाळी यायची. ( फोटो हातांत घेऊन ) सुमाताई, तुम्हाला कल्पना तरी आहे कां काय गोंधळ चालला आहे तुमच्या भवितव्याचा ती ? किती निष्पाप निरागस मुद्रा आहे ही ! या रत्नाला जर मी अंतरलों तर माझ्यासारखा मूर्ख मीच. ( श्यामकांत हातांत प्रुफं घेऊन येतो )

**श्याम**—काय ही कशी आहे मुलगी ?

**प्रभा**—छान आहे. ठरलं कां नक्की तुमचं ?

**श्याम**—आतां देण्याघेण्याचं बोलणं व्हायचं आहे फक्त.

**प्रभा**—असं, बरं जातों मी.

(जातो. श्यामकांत प्रुफं तपाशीत बसतो. मध्येंच सुमनचा फोटो बघतो.)

[ पडदा पडतो.

---

## प्रवेश २ रा

( एक बाग. एका बाकावर श्यामकांत सुमतीची वाट पहात बसला आहे. मधून मधून घड्याळाकडे पाहातो इतक्यांत सायकल हातांत घेऊन पद्माकर प्रवेश करतो. )

**श्याम**—ओहो. आपण इकडे कोणीकडे ? खेळायला निघाला वाटतं !

पद्मा––हो. आजही मॅच आहे आमची.

श्याम––परवां झाली ना एक मॅच? आज दुसरी आहे वाटतं? तुमच्या बहिणीचं लग्न ठरलं म्हणून ऐकलं...

पद्मा––हो. आलाय बहुतेक ठरत. तुमच्या धुळ्याचेच ते प्रभाकरपंत आहेत. तुम्ही ओळखतांना त्यांना?

श्याम––हो. त्यांच्याशींच ठरलं कां?

पद्मा––म्हणजे अजून नक्की नाहीं झालं कांहीं. तात्या गांवाला गेले आहेत. आज उद्यां ते येतील. मग काय ते नक्की होईल.

श्याम––मग सध्यां कोठपर्यंत ठरलं आहे?

पद्मा––सध्यां म्हणजे त्यांना मुलगी पसंत आहे एवढंच झालं आहे. पण आतां बहुतेक जमेल.

श्याम––ते पाहायला आले होते वाटतं?

पद्मा––ते आले होते परवां. आमची सुमती पण गेली होती त्यांच्याकडे आणि तिला पसंत असल्यामुळें तात्या बहुतेक पैशासाठीं कांहीं मोडायचे नाहींत. कारण त्यांना तें स्थळ फारच पसंत आहे. बराय. जातों मी आतां. उशीर होतो आहे माला.

श्याम––म्हणजे नक्कीच दिसताहे. कांहीं घोटाळा नाहींच आहे त्यांत. (सुमति येते. ती स्मित करते. पण श्यामकान्ताची कठोर मुद्रा पालटत नाहीं. हातानेंच तो तिला बाकावर बसायची खूण करतो.)

सुमति––आज घरीं न येतां ही कुठली भेटायला जागा काढली आहे?

श्याम––सुमति तुझं लग्न ठरल्याचं ऐकलं मी?

सुमति––माझं? हो हो ठरलंच आहे. तुमच्याशींच म्हणतां ना?

श्याम––हें बघ सुमति, थट्टा करायच्या ह्याच्यांत मी नाहीं सध्यां. माला खरं सांग काय झालं आहे तें.

सुमति––म्हणजे काय? दादासारखंच म्हणायचा तुमचा हा कांहीं बेत आहे कां काय!

श्याम––माझा बेत कांहीं नाहीं. खरं काय आहे तें तू आपलं माला सांग

मी आपला निघून जाईन. तुझं लग्न ते प्रभाकरपंत पोतनीस आहेत त्यांच्याशीं ठरलं आहे. खरं आहे कां नाहीं ?

**सुमति**--कुणी सांगितलं तुम्हाला हे ?

**श्याम**--माला कुणी कां सांगेना ! खरं आहे कां नाहीं ते ? आणि तुला हवंच असलं तर सांगतों. तुझ्या दादांनींच माला सांगितलं. पांच मिनिटं नाहीं झालीं तो इथून गेल्याला. आणि शिवाय काल प्रभाकरपंतांनींसुद्धां सांगितलं माला. बोल आतां.

**सुमति**--बोलूं काय कपाळ ? तो प्रभाकरपंत म्हणजे मोठा हलकटच मनुष्य दिसतो आहे.

**श्याम**--अन् बंधु तुझे ? त्यांनीं पण माला तसंच सांगिवलं आहे.

**सुमति**--( गोंधळून जरा वेळ गप्प बसते.)

**श्याम**--आतां कां गप्प बसतेस !

**सुमति**--मग काय बोलूं ? स्थिति अशी झाली आहे कीं, आतां मी कांहीं जरी तुम्हाला सांगितलं तरी ते खरं वाटायचंच नाहीं.

**श्याम**--अग पण तुझा भाऊ कां खोटं बोलेल !

**सुमति**--त्याला वाटतं आहे माझ्या मनांतूनच त्या...कोण तो म्हणालात प्रभाकर कां कोण आहे त्यांच्याशीं लग्न करायचं आहे. अन् मी हिंडायला पण जाते त्याच्याबरोबर अन् इकडे याला मात्र खोटं सांगते जात नाहीं म्हणून. असं वाटताय त्याला.

**श्याम**--हो. मग हेंच त्याला कां वाटतय असं ? तूं सांगितलस ना त्याला, हे सगळं खोटं आहे म्हणून !

**सुमति**--सांगितल. पण त्याचा विश्वास वसतच नाहीं त्याला काय करूं पण मी तुम्हांला सांगते, तुमचा जर माझ्यावर विश्वास असला...

**श्याम**--हे बघ सुमति भलत्या भावनाला बळी पडणारा मी मनुष्य नाहीं. विश्वास होता म्हणूनच मी तुझ्यावर प्रेम करीत होतो. पण आतां तुझ्या भावाचाच जर प्रत्यक्ष तुझ्यावर विश्वास बसत नाहीं तर.........

**सुमति**--मग बोलणंच खुंटलं माझं,

**श्याम**—बोलणं खुंटायची काय जरूर आहे ? तुझं जर मन पालटलं होतं तर माला तसं कळवून कां नाहीं मोकळी झालीस ? ही फसवणूक कशाला ?

( बाकाच्या हातावर कोपर ठेवून तळहातावर गाल टेकून डोळे मिटून स्वस्थ बसते )

प्रभाकरपंतांच्यापेक्षां मी गरीब आहे, कबूल आहे मला. पण सांगायचं होतंस तसं. माला कांहीं राग आला नसता. अन् आला असतां तरी आतां जें चालवलं आहेस त्याच्यापेक्षां तें बरं वाटलं असतं.

**सुमति**—( उठून ) मी जाते घरीं आतां.

**श्याम**—कांहीं न सांगतांच जाणार आहेस ना ?

**सुमति**—मी सांगण्याचा उपयोग काय आहे ? अन् माला हें कांहीं सहनही होत नाहीं. आईचासुद्धां माझ्यावर विश्वास नाहीं. ( डाव्या हातानें पदराला डोळे पुशीत निघून जाते )

**श्याम**—( कांहीं वेळ बाकापुढें येरझारा घालतो. समोरून प्रभाकर व सुमन येतांना त्याला दिसतात. ) आं हा काय प्रकार आहे. ही तर काल ते नानासाहेब मनोळीकर आले होते त्यांची मुलगी. अन् ही यांच्याबरोबर कशी हिंडते आहे ? आज एकेक चमत्कारच चालू आहे.

( सुमन व प्रभाकर येतात. )

**प्रभा**—तुम्ही इकडेच आला आहांत वाटतं ?

( तो श्यामकान्ताशीं बोलावयास थांबतो. सुमन लांब जाऊन उभी राहाते. )

**श्याम**—( खुणेनें या कोण म्हणून विचारतो )

**प्रभा**—काल मी माझं लग्न ठरलं आहे म्हणून सांगितलं ना. सुमति शारंगपाणी म्हणून मुलगी नाहीं सांगितली ?

**श्याम**—बरं. मग ?

**प्रभा**—त्याच ह्या.

**श्याम**—काय !

**प्रभा**—( जरा पुढें होऊन ) सुमाताई तुम्ही तो पलीकडला हौद दिसतो आहे ना तिथें बसा, मी आलोंच एकदोन मिनिटांत ( ती जाते ),

**श्याम**—यांच नांव शारंगपाणी आहे !

**प्रभा**—हो. कां !

**श्याम**—काल माझ्याकडे फोटो दाखवला ना मी तुम्हाला. अगदीं. तश्शी थेट मुलगी दिसते आहे ही.

**प्रभा**—( किंचित् हंसून ) तश्शी कसली तीच आहे ही. तुम्हांला चमत्कारिक वाटणं साहाजिकच आहे. पण सांगतो मी तुम्हांला आतां. मी अगदीं मोकळ्या मनांनीं सांगतों आहें तितकंच तुम्ही पण हें दाखवलं पाहिजे हो. काय झालं. ही मुलगी पाहिल्यांनीं माला सांगून आलीं. होती. माला पसंत झाली, आम्ही एकदोनदां फिरायलाहीं गेलो होतो. अन् मग कांहीं कारणांवरून चूक आमच्याकडूनच झाली ती-पण कांहीं तरी होऊन वडील त्यांचें अगदीं संतापून गेलें. वास्तविक गैरसमज आहे तो सगळा. सांगेन केव्हां तरी. पण त्यामुळेंच संतापून ते तुमच्याकडे आले होते. पण मी तो गैरसमज दुरुस्त करणार आहे. आणि सुमाताईची त्याला मान्यता आहे. आतां तुम्हाला सांगायचं एवढंच कीं या घोटाळ्यामुळें तुम्हीं आणखी आमच्यावर संतापू नका.

**श्याम**—छेःहो. संतापण्याचं काय कारण आहे ?

**प्रभा**—तसं नव्हे. कालच मीं हें सांगायला पाहिजे होतं. पण म्हटलं एकदां सुमाताईना भेटून मगच काय तें करावं.

**श्याम**—पण मी तुम्हांला काल माझं लग्न ठरलं म्हणन सांगितलं....

**प्रभा**—हो तीच ही मुलगी.

**श्याम**—सुमती शारंगपाणी नांव आहे यांच ?

**प्रभा**—हो ना. बोलूं आपण पुढें केव्हांतरी. आतां मीं जातो. आम्हाला परत जायचं आहे लवकर; काय सांगायच त्याच्या वडलांना ते सगळं ठरवून. पण तें मगाशीं सांगितलेलं मात्र ध्यानांत ठेवा. तुमचा आणखी गैरसमज होऊं देऊं नका.

**श्याम**—( गवताची काडी तोंडांत घालतो. हातांतल्या काठीनें दगडाशीं खेळतो. मधेंच दगड उचलून घेतो. ) मग मीं एक गाढवपणाच

करून ठेवला आहे ! हा तिला सुमति शारंगपाणी समजतो आहे. आणि याच्या या आचरटपणामुळें मी सुमतीला वाटेल तसा बोललो. तत्त्वज्ञानाचा अभ्यास करायला लागला कीं माणूस व्यवहारांत गाढव ठरतो म्हणतात, ते स्वानुभवावरूनच माला कळणार असं दिसताहे. पण यांत भानगड काय आहे ? या पोरींनीं याची फसवणूक चालवली आहे कां हा माला थापा देतो आहे ? कां नानासाहेबांचा कांहीं डाव आहे यांत ? ते कांहीं असलं तरी सुमतीला आतां काय सांगावं हा प्रश्नच आहे. ती तर आतां माझं तोंडही पाह्यची नाहीं. ( नानासाहेब येतात. श्यामकान्त विचार मग्न होऊन बसलेला असतो. त्याला पाहून )

**नाना**—आं. आपण आलाच वाटतं लगेच.

**श्याम**—हो. काम नव्हतंच कांहीं. आलो.

**नाना**—बरं झालं. मग आतां घरी केव्हां येतां ? कां मीच येऊं आपल्याकडे.

**श्याम**—नाहीं, यायचं कुणीकुणाकडे तो कांहीं महत्त्वाचा प्रश्न नाहीं. पण त्याच्या आधीं माला थोडसं विचारायचं होतं, बसा ना आपण जरा; आमच्या गांवचेच ते एक प्रभाकरपंत पोतनीस आहेत. त्यांच्याकडे आपल्या मुलींसाठीं आपण खटपट केली होती ?

**नाना**—प्रभाकर पोतनीस ? कोण प्रभाकर पोतनीस ? कुणी सांगितलं तुम्हांला हे ?

**श्याम**—म्हणजे माहीतही नाहीं मनुष्य आपल्याला ता ?

**नाना**—छे हो. नांवही ऐकलं नाही मी अजून त्याचं

**श्याम**—माला वाटलंच तो माला थापा देत असला पाहिजे.

**नाना**—म्हणजे ? त्यांनी स्वतःच सांगितलं ? मोठा चमत्करिक दिसतो आहे मनुष्य हा. मी पाहिलाही नाहीं अजून त्याला,

**श्याम**—पण आपल्या मुलीची न् त्यांची ओळख बरीच असली पाहिजे.

**नाना**— कशावरून म्हणतां आपण ?

**श्याम**—तें सांगतो. आतां त्यांत कांहीं वाईट आहे असं माला मुळींच

म्हणायचं नाहीं. हल्लीं पुष्कळ ओळखी होतात तशा. अन् फिरायलाही जातात लोक असे.

**नाना**—आमची सुमन फिरायला जाते नेहमीं त्याच्याबरोबर ?

**श्याम**—नेहमीं म्हणजे ऽ ऽ तसे कांहीं पुष्कळ दिवस नाहीं झाले. पण आतां ती दोघं तिकडे पलीकडे गेलेली पाहिली म्हणून म्हटलं.

**नाना**—काय ! सुमन त्याच्याबरोबर गेली आहे ! आत्तां ! कुठें आहे ती !

**श्याम**—तो हौद आहे ना, त्या आंब्याच्या झाडाच्या उजव्या बाजूला त्या कर्दळी आहेत त्या...हौदाच्या पलीकडे बसले आहेत ते (दाखवितो.)

**नाना**—चला आधीं तिकडे.

**श्याम**—थांबा. आपण थांबा इथेंच. मीच बोलावतो त्यांना इकडे कारण एकादवेळेस संतापण्याजोगं कांहींच नसणं शक्य आहे त्यांत. चालतं असं अलीकडे नेहमीं. आतां लग्न ठरलं म्हणून सांगितलं त्यांनीं तो अगदीं पाजीपणा आहे. पण मी घेतो हजेरी त्याची त्याच्यासाठीं; आपणच तिथें आलांत तर मग प्रकरण भलत्या थराला जाईल असं वाटतं. खरंच बसा आपण. मी घेऊन येतो त्यांना.

**नाना**—अन् त्या लफंग्यालाही घेऊन या इकडे.

**श्याम**—नको. ते तर नको म्हणतो आहे मीं. मीं त्याला हे कांहींच सांगत नाहीं. कांहीं तरी सांगून त्याला तिथेंच बसवून ठेवतो. यांना मात्र घेऊन येतो. ( जातो. व थोड्यावेळानें सुमनला घेऊन परत येतो )

**सुमन**—तुम्ही आज इकडे आलांत नाना ?

**नाना**—सुमा, त्या पोतनीसांची न् तुझी ओळख केव्हां झाली ?

**सुमन**—कोण पोनीस !

**सुमन**—असं बोलून माला आणखी कां त्रास देणार आहेस ? तूं त्या गृहस्थांच्याबरोबर हिंडायला आली आहेस ना ? ती ओळख नसतानांच का आली आहेस ! असं कसं तूं वागतेस ! कोण पोतनीस ते !

**सुमन**—पोतनीस कसले नाना ते ?

**श्याम-नाना**—मग ? पोतनीस नाहींत तर मग कोण आहेत ते ?

**सुमन**—इश्श. असं काय म्हणतां ?

**नाना**—म्हणजे काय ? हा काय वेडगळपणा करते आहेस तूं ?

**सुमन**—वेडगळपणा काय ? तुम्हीच माला सांगितलं ना ? परवां नाहीं कां मीं त्यांच्या घरीं गेले होते ? शारंगपाणीं ना नांव आहे ?

**नाना**—कुणाचं ? हा तो शारंगपाणी होय ? माझी थट्टा चालवलीं आहेस कां काय तूं ? असं कर, तूं घरीं चल माझ्याबरोबर. इथें नको हा तमाशा.

**सुमन**—पण नाना.......

**नाना**—तुं पुढं हो आधीं.

**श्याम**—सुमनताई तुमचा कांहीं तरीं गैरसमज झाला असला पाहिजे ? ते गृहस्थ आमच्या गांवचे आहेत. प्रभाकरपंत पोतनीस असं नांव आहे त्यांच. त्यांना दहा वर्षे आज मी ओळखतो आहे.

**सुमन**—असं कसं होईल पण.

**नाना**—ते काय ते मग पाहू. तूं घरीं चल आधी.

**सुमन**—पण त्यांना सांगून नको कां यायला ? मी आलेच जाऊन ( जाऊं लागते. )

**नाना**—ये तुला वाटेल तेव्हां. मी जातो. ( निघून जातात ) ( सुमन भिऊन उभीं राहाते. )

**श्याम**—त्यांना मी सांगेन तुम्ही वडलांच्याबरोबर गेलात म्हणून. तुम्ही जा आतां. ( सुमन मागें पाहात पाहात नाना गेले त्या बाजूला जाते. आंत गेल्यावर 'नाना थांबा, आले.' असें मोठ्यानें सांगते. ) हे सुरेख जमलं आहे आतां. तो हिला शारंगपाणी समजतो आहे, ती त्याला शारंगपाणी समजते आहे, अन् शारंगपाणी दोघंही नाहींत. अन् जी खरी आहे तिला मी यांच्या या आचरटपणासाठीं शिव्या देऊन घेतल्या आहेत, पण हे प्रभाकर. पंत आमचे फसवाफसवी करताहेत कां स्वत: त्यांच्याच कांहीं गोंधळ झाला आहे ? नाहींतर त्यांना बोलायला जाईन अन् पुन्हां सुमतीसारखं ते गळ्यांत येईल. सुमतीला भेटल्यावाचून आता कांहींच बोलूं नये ते बरं, ( प्रभाकराला हाका मारतो, तो येतो.)

**प्रभा**----हें काय ? सुमाताईंचे वडील आले होते ना ? कुठें आहेत ते ? अन् त्या कुठे आहेत ?

**श्याम**---त्या गेल्या वडलांच्याबरोबर.

**प्रभा**---गेल्या ? म्हणजे ?

**श्याम**---फारच कांहीं निकडीचं काम होतं. म्हणून माला सांगून गेल्या त्या. तुम्हाला माला त्यांनीं हें सांगायला सांगितलं आहे.

**प्रभा**---असं होय. माला एकदां भेटायचं होतं नानासाहेबांना.

**श्याम**---मनोळीकरांना ?

**प्रभा**---कोण मनोळीकर. अहो ते नानासाहेब शारंगपाणी नव्हते कां आले आत्तां? तुम्हीच सांगितलंत नाहीं कां ?

**श्याम**---हं हं. त्या सुमति शारंगपाणी होन्या त्यांचे वडील ? ( हसूं दाबायचा प्रयत्न करीत पलीकडे जाऊन खोकतो, )

**प्रभा**---हो, बरं उद्यां भेटेन आतां, बराय. मी जातो. तुम्ही येतां आहां कां थाबायचं आहे कांहीं नवीन लेखाचा विचार करीत ?

**श्याम**---नाहीं नाहीं मी येतोच ना ?

( जातात. पडदा. )

---

## प्रवेश तिसरा

( नानासाहेब मनोळीकर यांचा वाडा. अस्ताव्यस्त पडलेले सामान गेनू आवरून ठेवीत आहे. काम करतां करतां तो लावणी गुणगुणतो ' राजाची व्हो राजकन्या बहुयेक सुंदरा जी ' नानासाहेबांचीं पावलें ऐकतांच लावणी थांबवतो. नानासाहेब येतात. )

**गेनू**---ताईन्नि सांगातलय कां मना यायाला उशीर व्हईन म्हनल्या. तो बाप्या आलतां कां मोटर घेऊनशान्, त्याच्या संग गेल्यात त्या. तर म्हंगाल्या कां सांग नानान्ना. माला सांगाया सांगितलं हाये. ( नानासाहेब कांहींच लक्ष न देतां कोट रुमाल काढतात. गेनू बोलत राहातो ) जेव-

नाच्या वक्तापोत येईन म्हनाल्या. . बर म्हनाल्या योळही लागन. त्याचा काय बांध नाय म्हनाल्या. तो बाप्याबी म्हनत व्हता - - -

**नाना**—पुरे रे.वटवट वट वट सारखी. हें आंत नेऊन ठेव आधीं. एक काम लेकाच्याच्या हातून धड व्हायचं नाहीं. अन् वटवट करायला सांगा तेवढी. चल नीघ इथून. ( चूळ वगैरे भरावयास नानासाहेब आंत जातात. गेनू जाऊं लागतो. सुमन येते )

**गेनू**—( हलक्या स्वरानें ) तुम्ही इकत्या बिगुनीच आला आय ! अन म्या सांगातलना नानान्ना, कां जेवान येळपोत येत न्हाईत म्हनुन.

**सुमन**—बरं बोलूं नकोस मोठयांनीं आतां. जा तिकडे. नाना रागावले आहेत.

**गेनू**—( दाबल्या आवाजानें ) रागावलं ? कयासाठीं ?

**सुमन**—जा मेल्या एकदां तिकडे. तुला दर वेळेला सगळं सांगितलं पाहिजे. ( तो वाईट तोंड करून जातो. नानासाहेब रुमालाला तोंड पुशीत बाहेर येतात. श्यामकान्त येतो. सुमति आंत जाते )

**नाना**—या. बसा. हं काय आतां तुम्हांला तरी सांगणार मी ? झालं हें अगदीं गैरवाजवीच झालं आहे. पण आतां आपण बोलूं नये कुठें इतकंच आमचं आपलं म्हणणं

**श्याम**—छेः छेः मी तसला कां मनुष्य आहे ? अगोदर यांत त्यांच्या-हातून कांहीं मोठं आक्षेपार्ह झालं आहे असं माला वाटतच नाहीं.

**नाना**—अहो आपल्याला नाहीं तसं वाटत. पण किती झालं तरी तें हेंच. तेव्हां कुठें वाच्यता न झालेली बरी,

**श्याम**—आपण अगदीं निर्धास्त असा त्याबद्दल.

**नाना**—बरं. मग आतां पुढें ?

**श्याम**—हो. त्यासाठींच मी आलों लगेच. माला वाटेल ते ध्यानांत आलें. म्हणून लगेच आलो. सुमाताईचा जसा गोंधळ झाला आहेना ? तसाच आमच्या प्रभाकरपंतांचा झालेला दिसतो आहे. काल ते आले माझ्याकडे. म्हणजे आपण आला होता ना त्याच्या आधींच दहा मिनिट. आणि माला सांगि-

तलं काय त्यांनीं–माला म्हणे–शारंगपाण्यांच्या सुमतीशी माझं लग्न ठरलं आहे' म्हणजे आपल्या मुलीलाच...सुमन ताईनाच प्रभाकरपंत सुमती शारंगपाणी समजताहेत.

नाना—कोण? तो मगाचा मनुष्य ? पोतनीस ? अहो हे होतं कसं असं! यांचे काय डोळे फुटलेले असतात कां काय? माला कांहीं हे खरं वाटत नाहीं बुवा. पाजी मनुष्य असला पाहिजे तो.

श्याम—तसंही शक्य आहे. माला आपलं कां वाटतं तसं ? आज दहा वर्षांचा परिचय आहे त्याचा माझा. अतिशय सज्जन मनुष्य आहे तो घराणंही चांगलं आहे त्याचं. पण कोणाची बुद्धी कशी फिरेल याचा नेम नाहीं हेही खरं आहे. तेव्हां तेंही शक्य आहे. पण त्यांनीं माला सांगितलं येवढं खरं. अन् त्या सुमती शारंगपाणीशींच माझं लग्न ठरलं होतं–ठरलं होतं म्हणजे तसं हें नव्हतं झालं. पण माझ्या मनांत ती मुलगी होती. पण यांनीं हें असं सांगितल्यामुळें मी आपल्याला रुकार दिला. अन् त्या बिचारीवर उगीच रागावलों. पण आतां .. म्हणजे वाईट आहे हें. मालासुद्धां अगदीं चमत्कारिक वाटतं आहे. पण माझा कांहीं इलाज नाहीं.

नाना—हं. ( श्यामकान्तानें सुमनला नाकारूं नये अशी नानासाहेबांची इच्छा आहे. पण त्यांना तसं म्हणतांही येत नाहीं. म्हणून त्यांची वृत्ति जरा थंड बेपर्वाईची झाली आहे.)

श्याम—आपल्याला राग येईल. पण मी तरी काय करणार ? त्यांनीं ते माला तसं सांगितलं म्हणून मी आपल्याला हो म्हटलं. तेव्हां....

नाना—हं.

श्याम—मग मी येतो आतां.

नाना—बराय !......( श्यामकान्त जातो )

( नानासाहेब त्रस्त मुद्रेनें खुर्चीवर पडून राहातात–सुमन येते ) सुमा काय चालवलं आहेस तूं हे ? ( ती कांहींच बोलत नाहीं. टेबलावर हात टेकून जमिनीकडे दृष्टी टाकून नुसतीच उभी राहाते.) काय ग सुमन, ऐकूं येताहे ना मुला ?

सुमन—पण मी.......

नाना—काय पण मी ? तुला जर शारंगपाण्यांचं स्थळ पसंत नव्हतं तर माला तसं सांगायला काय झालं होतं ?

सुमन—पण असं कुठें मी म्हणते आहे ? कांहीं तरीच मनांत घेतलं आहे तुम्ही. तुम्ही मला सांगितलंत नाहीं जा त्यांच्याबरोबर म्हणून ?

नाना— हो. मीच मूर्ख ठरलो. मी तुला सांगितलं शारंगपाण्याच्या बरोबर जा, तूं गेलीस तो कोण पोतनीस आहे त्याच्याबरोबर.

सुमन— पण नाना, मी सांगितलं ना ? ते त्याच वेळेला आले. मी कसं ओळखणार त्यांना ?

नाना—काय सांगते आहेस कांहीं तरी ? तू काय लहान आहेस का काय आतां ? म्हणें मी कसं ओळखणार ? दोन माणसं निरनिराळीं ओळखत नाहींत तुला ?

सुमन—पण असं काय करतां नाना ? मी या दोघाना जर पाह्यलंच नव्हत कधीं...

नाना—मग ? म्हणून काय झालं ! एवढं समजूं नये म्हणजे काय ?

सुमन—पण...

नाना—एक शब्द बोलूं नकोस आतां, माझं डोकं फिरायची वेळ आली आहे. करायला जावं काय अन् होतं काय ? मी साख समजतों आहें शारंगपाण्यांना तूं पसंत आहेस. म्हणून मी वेड्यासारखा गेलों त्यांच्या इथे. त्यांनीं माला नुसतं फजीत करून टाकलं तिथें. आयुष्य गेलं माझें. पण मी असं कोणाकडून फट् म्हणून घेतलं नाहीं. तो माझ्यावर प्रसंग आला. याची तुला आहे कां कांहीं ? फाजील झाला आहांत पोरी तुम्ही अलीकडल्या. तुम्हांला तुमचीं प्रेम दिसतात. पण आमचा जीव जातो त्याच्या पायीं, त्याची कुठें ही आहे ? आता मी चांगलं हें दुसरं स्थळं ठरवलं होतं तेही गेलं. तूं अशी त्या माणसाबरोबर फिरायला गेली होतीस म्हणूनच त्याचं मन बिथरलं असलं पाहिजे. ती सुमती शारंगपाणी न् ती सगळी थाप असली पाहिजे. हं. नशीब माझं. तुला बोलून काय उपयोग आहे.

( कोचावर पडून अंगावर उपरणें घेतात. सुमन पदरानें डोळे पुशीत अत्यंत जड पावलानें आंत जाते. नानासाहेब या कुशीवरून त्या कुशीवर होतात. त्यांना चैन पडत नाहीं. ते उठून बसतात. आपण विनाकारण इतकें बोललो असें त्यांना वाटूं लागतें. म्हणून ते सुमनला हांक मारतात ) सुमा ए सुमाताई. इकडे ये. ( सुमन येते व कोचापाशी उभी राहाते. )

**नाना**—( तिला खालीं बसवून ) काय असं वेड्यासारखं करतेस तूं सुमा ? आं ?

**सुमन**—पण मी खरं सांगतें तर तुम्ही कांहीं तरीच म्हणतां.

**नाना**—जाऊंदे ते आतां. कशामुळें कां होईना आपली फसगत झाली एवढं खरं. आतां ते शारंगपाणी जाऊं दे, अन् तो लफंग्याही जाऊं दे.

**सुमन**—पण खरं नाहीं नाना हें तुम्हांला वाटताय ते.

**नाना**—काय ? तो पोतनीस लफंग्या नाहीं. मग कसा फाजिलपणा केला त्यांनीं ?

**सुमन**—कांहीं तरी चुकलं असेल. कारण फसवाफसवी असती तर कांहीं दिसून नसतं कां आलं ! घर आहे, गडीमाणसं आहेत. बोलण्याचालण्यावरूनही समजतं थोडसं.

**नाना**—खरंच कुठें गेली होतीस ग त्यांच्या बरोबर तूं ? कुठेशीं घरं आहे त्याचं ?

**सुमन**—ती अमराई आहे ना ? तो देशमुखांचा बंगला आहे. त्याच्यापलीकडचच घर.

**नाना**—शाबास. मग काय ! शारंगपाणी राहातात या आनंदबागेशेजारीं.

**सुमन**—मग ते मी नाहीं म्हणतच नाहीं. पण त्यांच्या मनांत वाईट हेतु असतां तर त्यांनीं माला येऊनच दिली नसती. पुन्हां तुमची गांठ घ्यायचा बेत होता. आणी फसवायचंच मनांत असल्यावर कारकूनाला कोण पाठवील ?

**नाना**—मग तो चांगला मनुष्य असावा असं वाटतं तुला ?

**सुमन**—माला तरी वाटतं असं.

**नाना**—म्हणजे तिथें मी खटपट करावी असं म्हणतेस कां काय ? पण त्यांनी हा काय गोंधळ केला कशामुळें हे झालं, चुकून झालं का मुद्दाम केल हें समजायला पाहिजे. वरवर तुला दिसली असतील चांगलीं माणसं. श्यामरावही म्हणत होते तो चांगला माणूस आहे, घराणं चांगलं आहे त्याचं. पण पुष्कळ वेळा अशी फसवणूक होते. नाहीं कां ?

**सूमन**—माला नाहीं वाटत असं.

**नाना**—( किंचित हंसून ) बरं मग काय करूं म्हणतेस मी ? कांहीं खरं समजल्यावाचून माला तिथें जाणें बरं वाटणार नाहीं. त्यांना बोलावणं पाठवूं ?

**सुमन**—पण ते आतां यायचे नाहींत तसे. त्यांना त्या ह्यांनीं .... ते कोण मगाशीं आले होते...

**नाना**—- शामकांत

**सुमन**—त्यांनीं सांगितलं असेलच. अन् त्यामुळें तुमच्याकडे यायला त्यांना बरं नाहीं वाटणार.

**नाना**—मग काय करावं म्हणतेस ?

**सुमन**—(खालीं पहात ) मी गेलेलं चालेल ?

**नाना**—तूं .. ? पुन्हां त्या लफंग्या . . . (जरा हंसून) पण तो नाहीं तसा म्हणतेस नाहीं कां तूं ? पण . . . बरं जा. नाहीं म्हणून तूं काय ऐकायची आहेस थोडीच.

**सुमन**—-इश्श. असं वाटतं आहे कां तुम्हाला ? मी जातच नाहीं मुळीं.

**नाना**—-अग नाहीं. तसं नाहीं. जा. खरंच जा.

**सुमन**—नको. आतां मी नाहींच जाणार.

**नाना**—आतां काय लाजशीलन् काय मुरकशील. उठ जा पाहूं आधीं. ( सुमन हंसत हंसत उठते व जाते ) अरे गेनू त्या एकनाथाला गाडी घ्यायला सांग बाहेर.

[ पडदा

## प्रवेश चवथा.

( प्रभाकराचें घर. प्रभाकर कांहीं पत्रें लिहीत बसला आहे.)

**प्रभा**—आज आईकडून पत्र आलं आहे ना ? काय हो कृष्णाजीपंत ? ( ते बाहेर येतात ) आईकडून म्हटलं आज पत्र आलं आहे ना ?

**कृष्णा**—हो. आलं आहे ना ? ते तिथेंच आहे. काय ठरलं त्या मुलीबद्दल ते विचारलं आहे त्यांनीं. ताबडतोब कळवा म्हणून लिहिलं आहे.

**प्रभा**—हो कां ? काल ते भेटलेच नाहींत नानासाहेब. उद्यां लिहूं उत्तर मग. आज भेटेन मी बहुतेक त्यांना. ( कृष्णाजीपंत आंत जातात. सुमति दुसऱ्या बाजूनें येते. ) कोण पाहिजे तुम्हाला ?

**सुमति**—मी तुमच्याकडेच आले आहे. तुम्हीच ना प्रभाकरपंत पोतनीस?

**प्रभा**—हो. कां ? बसा ना.

**सुमति**—( बाकावर पाय ठेवून उभी राहाते ) मी तुम्हांला असं विचारायला आले आहे कीं तुम्ही जे गांवभर माझ्या बद्दल वाटेल ते सांगत सुटला आहात त्याचा अर्थ तरी काय ?

**प्रभा**—मी ? तुमच्याबद्दल सागत सुटलो आहे ? म्हणजे ? मी तर तुम्हाला पाहिलेलंही नाहीं अजून. अन तुमच नांवही माहीत नाहीं माला.

**सुमति**—म्हणूनच ज्याला त्याला सांगत सुटलांत वाटत तिच्याशी माझं लग्न ठरलाय म्हणून.

**प्रभा**—तुमच्याशीं माझं लग्न ? काय म्हणतां तुम्ही हे ? तुमचं नांव काय ?

**सुमति**—माझं नांव सुमति शारंगपाणी.

**प्रभा**—( जरा हंसून ) असं होय. मग बरोबर आहे. तुमचा असा गैरसमज होणं साहजिक आहे.

**सुमति**—गैरसमज ?

**प्रभा**—सांगतों मी काय तें. तुमच्या गावांत एकाच नावाच्या दोन मुली असल्या पाहिजेत. आणि त्यामुळें हा घोटाळा झाला असला पाहिजे.

तुम्ही म्हणतां तसं मी सांगितलं एक दोघांना हें खरं आहे. पण त्या सुमति शारंगपाणी तुम्ही नाहीं.

सुमति—मी नव्हे. पद्माकर शारंगपाणी हा त्या दुसरीचाच भाऊ आहे वाटतं ? त्याला तुम्ही सांगताहा सारखे, तुमची बहीण म्हणे माझ्या घरीं आली होती. माझ्या बरोबर हिंडायला आली होती. कां त्या दुसरीच्या भावाचं नावही पद्माकरच आहे ? दोन सुमति शारंगपाणी झाल्या आमच्या गांवात तसे त्यांचे दोन भाऊही झाले असतील !

प्रभा—तुमच्याही बंधूंच नाव पद्माकर आहे ? म्हणजे चमत्कारिक आहे हे.

सुमति—माला थोडी आशा होती कीं प्रत्यक्ष येऊन सांगितल्यावर तरी तुम्ही थोडें वरमाल आणि कबूल कराल. तुमच्यासारखे सभ्य गृहस्थ इतकं हें करतील असं नव्हतं माला वाटलं.

प्रभा—हें पहा मिस् शारंगपाणी, तुम्हांला राग येणें साहजिक आहे. मी कबूल करतो. आणि ही सारखी नांव असल्यामुळें तुम्हांला जो त्रास झाला त्याबद्दल मी तुमची सपशेल माफी मागतो. पण माझी विनंति अशी कीं एक-दम असभ्य वगैरे एखाद्या माणसाला म्हणूं नये. मी मुलीचं नांव सांगतांना जास्त काळजी घ्यायला पाहिजे होती हें खरं आहे. यापुढें मी घेईनही. पण एकाच नावाच्या दोन मुली आहेत याची माला खरोखरीच कल्पना नाहीं.

सुमति—( चिडून ) कुठल्या दोन मुली आणल्या आहेत तुम्ही ? काय वाटेल तें सांगतां कां काय माला ? ती दुसरी मुलगी होती तुमची तर माझ्या भावाला कशाला सांगितलंत ? आणि फोन कशाला आमच्या इथें केलात ? म्हणे मुलगी पसंत आहे माला ? केव्हां हो पाह्यला आला होतात तुम्ही माला ?

प्रभा—मी तुमच्याकडे फोन केला ? कृष्णाजीपंत इकडे या बरं जरा. ( ते येतात )

सुमति—हो. हो. तुम्ही केलात. तेरवाच्यादिवशीं संध्याकाळीं फोन केलात तुम्ही. कां ते ही आतां नाहीं म्हणायचा विचार आहे ? अन् फोन-मधून दादाला मी विचारायला सांगितलं केव्हां पाहायला आला होता म्हणून, तर म्हणे कांहीं तरी घोंटाळा आहे, मी आमच्या कारकुनाला पाठवतो. मग कुठें आला नाहीं कारकून तुमचा तो ? का मेला तो त्या दिवशींच ?

**प्रभा**—तुमच्या म्हणण्यावरून माझ्या हातून फार भयंकर घोंटाळा झाला आहे असं दिसतं. मान्य करतों मी. बरं कां मिस् शारंगपाणी. पण कारकुनाची गोष्ट काढलीत हे बरं झालं. तुमच्याकडे फोन आला त्याअर्थी आम्हीं कांहीं तरी फार मोठी चूक केली आहे हें खरंच आहे. पण असभ्यपणाचा आरोप तुम्ही करतां आहां; आणि मी कांहीं तरी थाप दिली असली पाहिजे असं जें वाटतं आहे तुम्हांला तें कांहीं खरं नाहीं. मी ज्या दुसऱ्या शारंगपाणी म्हणतो आहे त्यांच्याकडे यांना-हेच ते आमचे कारकून कृष्णाजीपंत-यांना पाठवलं होतं कां नाहीं पहा ? कृष्णाजीपंत तेरवांच्या दिवशीं आपण त्या शारंगपाण्यांच्याकडे फोन केला आणि त्यांत कांहीं घोंटाळा वाटला म्हणून मी तुम्हांला नाहीं माणून त्यांच्याकडे जायला सांगितलं ?

**कृष्णाजी**—मग मी जाऊंन सोडलं कीं त्या दिवशीं. सांगितलं त्यांना. ते काय म्हणायला लागले—आपले नानासाहेब—ते ह्मणायला लागले मुलगी नापसंत आहे असंच फोनांतून कळिवलंत तुम्ही. म्हटलं अहो नाहीं—

**प्रभा**—हें माला चांगलं पाठ झालं आहे. तुम्ही पन्नाससाठवेळां सांगितल्यामुळें. आतां यांना तुम्ही गेला होता कां नाहीं एवढं सांगा.

**सुमति**—कुठेशीं गेले होते ते ? विचारा बरं त्यांना.

**कृष्णाजी**—म्हंजे पत्ता माझा चुकला असेल असं म्हणता होय ? अहो मुंबईत मी पहिल्यानी गेलो तेव्हांसुद्धां नाहीं पत्ता चुकला. माला वाटतं नमुताईची पहिली मंगाळागौर होती तेव्हां. नाहीं आप्पासाहेब ? मी अगदीं पहिल्यानीच गेलों होतों मुंबईला.

**प्रभा**—परवा मी धाडलं तुम्हांला, तेव्हां तुम्ही कोणत्या पत्त्यावर गेला होतात ?

**कृष्णाजी**—त्या खिऱ्यांच्या चौकांतून वळून उजव्या हाताला गेलं म्हणजे चौथा वाडा आहे. तो पार आहे मोठा अन् पलीकडेच छापखाना आहे.

**सुमति**—तिथे गेला होतांना तुम्ही ? बरं एवढं तरी खरं सांगितलंत. तिथें ते नानासाहेब मनोळीकर राहातात. तिथें कुठली हो शारंगपाणी

आणलीत तुम्ही ! बरं झालं माझा दादा त्या मनोळीकरांच्या मुलीला पाहायला जायचा होता म्हणून, मला तो वाडा तरी माहीत झाला आहे. नाहीं तर मी आपली खरंच समजले असते तिथें दुसरी एक सुमति शारंगपाणी आहे म्हणून. सगळ्याच थापा आहेत तुमच्या या. अन् तुमचे हे कारकूनही त्यांतलेच दिसताहेत. पहिल्यांनींच मला वाटलं होतं. पण म्हटलं गृहस्थ जरा सोज्वळ दिसताहेत. पण तुमचेच कारकून आहेत ते.

**कृष्णाजी**—काय बोलतां वाटेल ते! सगळी हयात घालवली मी इथें पण मिंधेपणा कधीं पत्करला नाहीं. या आप्पासाहेबांच्याच मुंजींत त्यांच्या काकांनींच एकदां शंभर रुपयाची गफलत करायला सांगितली होती.; भुसावळला होते काका ते. नुकतेच वारले ते. गेल्या सालीं आतां फक्त धाकटी सून आहे त्यांची. तर त्यांनासुद्धां मी साफ सांगितलं कीं आपल्या हातून व्हायचं नाहीं हें. अन् तुम्ही–

**सुमति**—तें मला सांगून काय उपयोग ? सध्यां मला तुम्ही फसवलंत एवढं खरं. बरं मी जातें आतां. इथून पुढें तरी माझ्याबद्दल वाटेल तें सांगू नका. माझ्या जन्माचं तुम्ही वाटोळं करायची वेळ आणली आहेत. माझ्या भावाचा माझ्यावर विश्वास नाहीं, आईलासुद्धां तसंच वाटायला लागलं आहे. अन् शेवटीं श्यामकान्तांच्या कानांतसुद्धां वीष ओतायला तुम्ही कमी केलं नाहीं. दादाला मी आज घेऊनच येणार होते. पण त्यालाच वाटतं आहे कीं मी तुमच्याबरोबर गांवभर हिंडतें अन् घरीं खोटं सांगतें. कालपासून तो धड बोलतच नाहीं माझ्याशीं. पण ध्यानांत ठेवा माझे वडील आज येतील. पुन्हां तुम्ही माझी नालस्ती केलीत तर मी त्यांना सांगून देईन आणि मग...मग या गांवात तुम्हाला पाऊल नाहीं ठेवतां येणार, येवढं मात्र ध्यानांत ठेवा. जाते मी आतां. ( जावयास निघते इतक्यांत श्यामकांत येतो. )

**श्याम**—आं ! तूं इकडेच आली आहेस वाटतं.

**सुमति**—मग काय करूं ? तुम्ही माझं लग्न लावून दिलं आहेत ना यांच्याशीं ? मग नको यांच्याकडे यायला मला ?

**श्याम**—झाला खरा बुवा गाढवपणा. पण सुमति माझ्याकडे त्याचा दोष—म्हणजे मी अगदींच मुटून जायला पाहतो आहे असं नाहीं—पण यांनीं गोंधळ केला तो भोंवला आहे माला सगळा. तुम्ही प्रभाकरपंत काय भानगड चालवली आहे ही ? तुम्ही त्या मनोळीकरांच्या मुलीलाच सुमती शारंगपाणी समजताय महाराज. आपण मगाशी तिकडे फिरायला गेला होतो ना, तेव्हां आपल्याबरोबर होती ती सुमति शारंगपाणी कां होती ?

**प्रभा**—मग नाहीं तर कोण होती ?

**श्याम**—शाबास अजून तुमच्या डोक्यांत तेंच आहे कां ? अहो ती मनोळीकरांची मुलगी. ते नानासाहेब मनोळीकर आहेत ना, त्यांची मुलगी ती.

**प्रभा**—कुणी सांगितलं तुम्हाला ?

**श्याम**—अहो सांगायला कशाला पाहिजे. तिच्याचसाठीं तर नानासाहेब माझ्याकडे आले होते अन् ती गेली कीं मगाशी वडलांच्या—म्हणजे त्या मनोळीकरांच्याबरोबर.

**प्रभा**—मग मी तुम्हाला सांगितलं त्या शारंगपाणी आहेत म्हणून तेव्हां नाहीं कांहीं तुम्ही म्हणाला कुठें ?

**श्याम**—म्हणणार होतो. पण त्याचा परिणाम काय होईल हेंच माझ्या ध्यानांत येईना. मी म्हटलं तुम्ही माला थाप देतां आहां, कां त्या मुलींनीं तुम्हांला थाप दिली आहे, कां नानासाहेब माला झुलवताहेत. कांहींच कळेना माला. म्हटलं गप्प बसावं जरा.

**प्रभा**—पण......

**श्याम**—ऐकून घ्या. बहारीचा भाग पुढेंच आहे.(सुमतीस) हे तिला सुमति शारंगपाणी समजताहेत अन् ती यांना पद्माकर शारंगपाणी समजते आहे.

**सुमति—प्रभा**-काय ?

**प्रभा**—पण असं झालं कसं ?

**श्याम**—तोच तर अजब प्रश्न आहे ? मालाही उलगडत नाहीं काय भानगड आहे ती. तुमचा झाला तरी कसा हा गोंधळ ? कुठें भेटली तुम्हाला मुलगी ती ?

प्रभा—भेटली कसली ? मी पाहायलाच गेलो होतों तिला.

श्याम—तिला ? पण तुम्हांला बोलावलं होत कुणी तिला पाह्यला ? ते नानासाहेब म्हणताहेत तो कोण प्रभाकरपंत त्याला मी पाह्यलासुद्धां नाहीं.

प्रभा—पण ते नानासाहेब शारंगपाणी......

श्याम—तात्यासाहेब शारंगपाणी महाराज.

सुमति—खरंच. तात्यांनीं यांनाच बोलावलं होतं.

श्याम—तात्यासाहेबांनीं ? कशाला ?

सुमति—माला पाहायला ?

श्याम—तुला?शाबास. ही काय भानगड आहे ? बरं ते पाहूं मग. पण मग तुम्ही त्यांच्याऐवजीं त्या मनोळीकरांच्याकडे गेलात कां काय ? काय हो. काय केलत तरी काय तुम्ही ?

प्रभा—थांबा आं. मी ती चिठी सांपडली तर बघतो. [ जातो.

श्याम—( क्षणभर श्यामकान्त व सुमति एकमेकाकडे पाहातात. सुमति आपली दृष्टी चटकन दुसरीकडे वळवते. ) सुमति माफ कर माला.

सुमति—( दृष्टि त्याच्याकडे न वळवतां अगदीं गंभीरपणें ) कशासाठीं ?

श्याम—मी काय जे बोललो मगाशी त्याच्यासाठीं. तूं पाहिलसच ना आतां ? आमच्या प्रभाकरपंतांच्या गोंधळामुळें...

सुमति—त्यांनीं गोंधळ केला, त्यांनीं तुम्हाला चुकीचं सांगितलं—ते असू द्या. पण ते तसं नाहीं म्हणून मी सांगत होते ना ? त्याच्यावर कांहीं तुमचा विश्वास बसला नाहीं.

श्याम—हं ते थोडसं झालं खरंच त्याच्यासारखं. पण सांगू कां तुला ? मी तो थेसिस लिहितो आहे ना सध्यां ? त्याचं सारखं डोक्यांत चाललं आहे भ्रमण. अहोरात्र तेच. सारखं. कर्मविपाक, जडवाद, जीवनहेतू, अज्ञेय वाद, अंतर्मन, बहिर्मन सगळा गोंधळ होता डोक्यांत. त्यामुळें त्यांनीं ते सांगितलं माला—प्रभाकरपंतांनीं—त्यावर शांतपणें विचार करून नीटस हें करायला वेळच झाला नाहीं,

**सुमति**—पण तुमचं हें असलं तत्वज्ञानाचं लिखाण नेहमींच चालायच आहे ना ?

**श्याम**—मग ?

**सुमति**—मग पुन्हां असें प्रसंग नेहमींच येतील. तुम्ही कांहीं तरी लिहीत असणार. तुम्हाला कुणी तरी सांगणार कीं सुमतीचं लग्न दुसऱ्या कुणाशी तरी ठरलं आहे.

**श्याम**—वा. लग्न झाल्यावरसुद्धां मी असं करीन वाटतं ?

**सुमति**—तत्वज्ञानी माणसाचा काय नेम आहे ! भ्रमण असायचं ना डोक्यांत सारखं !

**श्याम**—ए तूं वाटेल ते बोलते आहेस आं आतां. करते आहेस कां नाहीं तू माला माफी ? बोल आधीं ?

**सुमति**—बाई ! म्हणजे माफी सुद्धां जुलमानीच करून घ्यायचा बेत आहे कां काय तरी.

**श्याम**—ते काय वाटेल ते म्हण. पण याचं उत्तर दे आधीं.

**सुमति**—तुम्ही ते तत्वज्ञान न् तो थेसिस, सगळ सोडून देणार असाल...

**श्याम**—थेसिस लिहूं नको ? त्याच्यावर तर माझं सगळं भविष्य अवलंबून आहे.

**सुमन**—पण तें सोडून देण्यावर माझं भविष्य अवलंबून आहे.

**श्याम**—अग पण...

**सुमति**—हे कोण ! दादा आला कां काय इकडे ?

( पद्माकर येतो.

**पद्मा**—शाबास. तूं इकडे येऊन बसलीच आहेस ना ? कहर झाला सुमे तुझ्यापुढें. विचारलं तर म्हणे मी त्यांना ओळखीत नाहीं. ते पहायलाच आले नव्हते. मी त्यांच्याबरोबर गेलेच नाहीं. आणि अशीं वाटेल तेव्हां इकडे येऊन बसतेस काय ! अजूनसुद्धां तुझीन् प्रभाकरपंतांची ओळख नाहीं अस सांगण्याचा बेत असेल तुझा.

**सुमति**—तें सांगतें सगळं. पण आपण आतां इकडे कसें आलांत !

**पद्मा**—तात्या आले आहेत घरीं. आल्याबरोबर त्यांनीं विचारलं तूं कुठें आहेस म्हणून. मी म्हटलच त्यांना नाहीं नाहीं म्हणत-म्हटलं-ती प्रभाकरपंताच्याकडेच गेली असेल. पाहातो तों खरंच. [ प्रभाकर येतो ] काय हो तात्या आमचे घरीं आले आहेत. थोडा वेळ आमच्या ताईसाहेबांना घरीं यायला परवानगी आहे कां नाहीं.

**प्रभा**—पद्माकरपंत तुमचा मी एक अक्षम्य अपराध केला आहे.

**पद्मा**—अहो असं नाहीं म्हणत मी. आत्तां तात्या घरी आले आहेत म्हणून मी बोलावयाला आलो. नाहीं तर, ही आली तुमच्याकडे म्हणून कांहीं अपराध म्हणायचं कारण नाहीं.

**प्रभा**—तसं नव्हे अहो. मी तुमच्याकडे यांना पाहायाला आलोच नव्हतो त्या दिवशीं

**पद्मा**—अहो, म्हणून काय झालं ? तुम्ही न येतां ती तुमच्याकडे आली म्हणून बिघडलं काय ? माला कांहीं वाटत नाहीं त्यांत.

**प्रभा**—अंहं अंहं ! ते नाहीं सांगत मी.

**पद्मा**—अहो पण तुम्ही कांहींच मानूं नका. रीतिभातींत कांहीं चुकलं एवढंच ना ? तें कांहीं मी म्हणत नाहीं. ताईला आतां घरीं पाठवतां आहां कां नाहीं ते सांगा.

**प्रभा**—तसं नाहीं हो. सांगतों मी तुम्हाला. बसा जरा. ( पद्माकर प्रश्नार्थक मुद्रा करून बसतो. सुमन मनोळीकर येते. सर्व लोकांना तेथें पाहून ती जरा गोंधळते. थोड्यावेळानें प्रभाकराजवळ जाऊन त्याला सांगते)

**सुमन**—तुम्हांला नानांनीं घरीं बोलावलं आहे.

**प्रभा**—सुमाताई आपल्या या प्रकरणांत एक फारच मोठा घोंटाळा झाला आहे.

**सुमन**—ते सगळं समजल आहे माला. अन् नानानांही समजलं आहे.

**प्रभा**—नानानाही समजलं आहे ? अन् तरी त्यांनीं माला बोलावलं आहे.

**सुमन**—हो. तिथें आल्यावर समजेल सगळं. मी गाडी घेऊन आले

आहे. आणि यांना [ शामकान्ताकडे हातकरून ] सुद्धां नानांनीं बोलावलं आहे.

**श्याम**—आपण सगळेच जाऊं तिकडे. चला पद्माकरपंत ?

**पद्मा**—कुठें ?

**श्याम**—नानासाहेब मनोळीकरांच्याकडे?

**पद्मा**—हॅट? तो एक आचरट म्हातारा आहे. अन् त्याची ती पोरगी तसलीच आहे.

**श्याम**—अहो? थांबा. काय बोलतांतुम्ही हे ?

**पद्मा**—अहो त्यांनींच माला आपल्या मुलीला पाहायला बोलावलं होतं. आणि मी गेलो तर घरी कुणीच नाहीं. ती मुलगी नाहीं न् ते पण नाहींत.

**श्याम**—तुम्हाला पाहायला बोलावलं होतं त्यांनीं ! अहो याच त्यांच्या कन्या-सुमन ताई.

**पद्मा**—( एकदम दचकून उभा राहातो ) काय ? माफ करा आं माला. माझा कांहीं तसा हेतू नव्हता. म्हणजे माला कांहीं माहितो नाहीं.

**श्याम**—ते जाऊं द्या आतां. तुम्ही आतां तिकडे चला आधीं. तुमचा तर फारच उपयोग होणार आहे ही भानगड सोडवायला.

**सुमन**—पण दादा घरी जायंच आहे ना आपल्याला ?

**श्याम**—तुम्ही चला. मी सांगतो कुणाला कुठे जायचं ते. चला प्रभाकरपंत, ( जातात पडदा ]

---

## प्रवेश पांचवा

( नानासाहेबांचें घर. मध्यभागीं नानासाहेबांची जागा रिकामी आहे. सुमन, सुमति, पद्माकर, प्रभाकर, श्यामकान्त )

**श्याम**—मग दोन्ही तीन्ही दिवसांत नानासाहेबांचीन् तुमची गांठच पडली नाहीं म्हणतां ?

**प्रभा**——नाहीं ना. नाहींतर प्रश्नच नव्हता. मी आपला यांना तात्यासाहेब शारंगपाण्यांची मुलगी असंच समजून चाललों होतों. पहिल्या दिवशीं मी लवकर आलो म्हणून गाठ पडली नाहीं. आणि दुसऱ्यादिवशीं ते आमच्याकडे यायच्याऐवजी यांच्याकडे गेले. कारण त्यांच्या मनांत मुलगी पद्माकरपंताच्या बरोबर गेली असंच होतं. पण अजूनसुद्धां—( खिशांत हात घालतो ) म्हणजे चूक झाली माझी हें तर खरंच आहे. पण हें पहा. हा पत्ता दिला यांनीं माला...पांचशेसात गुरुवार, तात्यासाहेब शारंगपाणी.

**पद्मा**——पांचशेसात ? बघूं बरं. हं मग काय ? इथेंच तर घोटाळा आहे सगळा. आमचा घरनंबर आहे पाचशेसाठ.

**प्रभा**——साठ ?

**पद्मा**——हो. तुम्ही तो उतरून घेतांना चूक केलेली दिसते आहे.

**प्रभा**——ते आमच्या कृष्णाजीपंतांच काम आहे. शाबास म्हणजे भलताच घोटाळा करून ठेवला त्यांनीं साठाचे सात करून.

**पद्मा**——मग त्यामुळेंच झालेलं दिसताहे हें सगळं. तुम्ही आमच्या ताईसाहेबांना पाह्यला येणार होतात त्या दिवशीं ते पत्ता चुकलात अन् मी इथें मुलगी पाह्यला यायच्या आधींच तुम्ही आलात.

**प्रभा**——झालं खरंच बुवा असं ? ( गेनू कांहीं सामान न्यायला येतो. )

**श्याम**——मग तुम्ही काय केलत पद्माकरपंत त्या दिवशीं ?

**पद्मा**— आम्ही काय करणार ? इथें आलो. तर घरांत कोण आहे ! ते गेनबा कां सोनबा कोण होते...( गेनूकडे पाहून. ) हां हेच पाहुणं होतं इथें. ते म्हणले नानासाहेब गेले आहेत बाहेर अन् त्या बाई बी एका बाप्यासंग मोटारींतून गेल्या. म्हटलं छान आहे. मग दोनतीन मिनिट वाट पाहिली न् त्या दुसऱ्या बाप्याला शिव्या देत घरीं गेलों.

**प्रभा**——[ गेनूस ] तूं हे आले होते म्हणून नानासाहेबांना नाहीं सांगितलस वाटतं !

**सुमन**——त्याला काय समजायचं आहे एवढं ?

**गेनू**...नव्हं नव्हं. तसं नव्हं, [ प्रभाकराकडे बोट दाखवून ] हे आलतं

कां तुम्हाला न्यायाला मोट्रींतून ? तर नानान्ना मी सांगातल का परभाकरपंत आलत म्हनुन, तर माला म्हंगाल गाढाव हायेस, मानूस आलं तर नांव बी नाय लक्षांत ठिवतां येत तुला. पदमाकरच नांव हाये त्यांच. मंग मपला चिप बसला खेटर मारल्यागत. आज्‌ पुन त्वांडच उघाडल नाय.

**श्याम**---पण कायहो प्रभाकरपंत मग फोन कसा नेमका यांच्या घरीं केलात तुम्ही ? कां तो बरोबर होता ?

**प्रभा**—तोच तर मुख्य घोटाळा झाला. फोनचा नंबर होता बरोबर अन्‌ घराचा चुकला होता. अन्‌ त्यामुळें मुलगी पाहायला गेलो एकीकडे अन्‌ पसंत आहे म्हणून फोन केला दुसरीकडे.

**सुमति**—दुसरीकडे म्हणजे आमच्याकडे. अन्‌ तेव्हांपासून आमचे दादासाहेब माला छळून छळून घेताहेत नुसते. कायरे बाबा आतां तरी समजलं कां तुला मी लाजत नव्हते ते.

**पद्मा**---हं. बरोबर दिसताय तुझं म्हणणं.

**सुमति**---नशीब माझं. तरी अजून खात्री नाहींच झालेली दिसत आहे.

**प्रभा** ---हा सगळा गोंधळ आमच्या कृष्णाजी पंतांनीं केलाय. ( नानासाहेब येतात. सुमती व सुमन मागल्या बाजूला उभ्या राहतात. नानासाहेब मधल्या रिकाम्या खुर्चीवर बसतात.) आतां मी स्वतःला अगदीं सोडवून घेतों असं मात्र मुळींच नाहीं. मी जास्त लक्ष ठेवायला पाहिजे होत. तेव्हां मी पण तितकाच दोषी आहे. तेव्हां माझी आतां विनंति इतकींच कीं नानासाहेबांनीं माला माफी करून झालेलं सगळं विसरून जावं.

**श्याम**---पण तुम्ही जो इथें गोंधळ करून ठेवला आहे. त्यांतून नुसत्या माफींनीं तुमची सुटका व्हायची नाहीं. यापेक्षां जास्त नुकसान भरपाई तुम्हांला द्यावी लागेल.

**प्रभा**—तुम्हीं सांगाल तें करायला मी तयार आहे. सुमाताईंच्या मनाला या प्रकरणामुळें फारच त्रास झाला असला पाहिजे. आणि पुन्हां गांठ पडलीतर जास्तच त्रास होईल हे खरं आहे. आणि त्यासाठीं मी कांहींही

करायला तयार आहे. या बाजूस पुन्हां कधीच मी फिरकूं नये अशी अर्थातच तुमची इच्छा असेल. माला मान्य आहे ती.

**श्याम**—तुम्हाला मानसशास्त्र समजत नाहीं म्हणून हा घोंटाळा होतो आहे. त्या साठींच तर मराठींत मी पुस्तक लिहितो आहे त्याच्यावर. अहो, मुलींनीं एकदां एखाद्याकडे प्रेमी नजरेनें पाहायला सुरुवात केली म्हणजे त्याच्या मनांत ( Complexes ) काय म्हणायचं. त्याला मराठींत—मनोगंड तयार होतात. आणि मग ते बदलणं अशक्य असतं. तेव्हां सुमाताईच्या मनाची काळजी तुम्हांला असली तर त्याला उपाय एकच आहे.

**प्रभा**—हा तुमचा मानसशास्त्रीय विनोद नानासाहेब कितपत सहन होईल यांची माला शंकाच आहे.

**नाना**—खरं सांगायचं म्हणजे ते माला नीटसं समजलं नाहीं. मी तुम्हांला आपल्या साध्या भाषेंत सांगतो. तुमचा काय घोटाळा झाला, तो माला सगळा समजला आहे. तेव्हां माझा आतां कांहीं तुमच्यावर राग नाहीं. पण या प्रकरणांत एक घोटाळा होऊन बसला आहे. आमच्यां सुमनला तुम्हीं पदरांत घेतलं पाहिजे म्हणजेच तो निस्तरेल.

**श्याम**—हेंच तर मी म्हणत होतों.

**प्रभा**—मग याला मी नाकबूल असणं शक्यच नाहीं. त्यांना मात्र विचारायला पाहिजे.

**नाना**—कुणाला ? सुमनला ? अहो तिनी हट्ट धरला म्हणून तर माला हें सगळं करावं लागलं. काय सुमन, खरं आहे ना मी म्हणतो आहे ते ? इकडे ये पाहूं...तुला पसंत आहेत ना हे.

**सुमन**—माला विचारूं नका हां कांहीं

**नाना**—बरं. प्रभाकरपंत तिच्या मनांतून दिसत नाहीं तसं.

**सुमन**—( एकदम ) असं म्हटलं वाटतं मी ?

**नाना**—मग, बोल खरं काय ते. तुझ्या या लाजण्यानींच सगळा गोंधळ केला आहे. सांग काय आहे ते ?

**सुमन**—मग यांत सांगायचं काय हो.

**नाना**—बरं. पुष्कळ झालं एवढं बोललीस तें.

**श्याम**—अरे, मग त्या कृष्णाजीपंतांनी तुमचा फायदाच करून दिला म्हणायचा !

[ गेनू येतो.

**गेनू**—[ नानासाहेबांना ] ते मघाचं लोक आल्यात.

**नाना**—आले कां ? मी जाऊन आलोच बरं का ? [ जातात.

**पद्मा**—आमच्या सुमाताईच्या दृष्टीनींसुद्धां कांहीं तोटा झाला नाहीं फारसा.

**सुमति**—तूं आतां कांहीं बोलूं नकोस बरं कां.

**पद्मा**—बरं का प्रभाकरपंत. तिच्या मनांतून तुमच्याशीं लग्न करायचंच नव्हतं.

**सुमति**—अरे पण तू गप्प बसं कीं. आधीच मी मघाशी नाहीं नाहीं ते बोलून वाटेल तो अपमान केला आहे त्यांचा.

**प्रभा**—पण त्यांत तुमची कांहीं चूक नाहीं मिस शारंगपाणी. माझाच मूर्खपणा होता.

**पद्मा**—अहो तुम्हीं तिच्या नादीं लागूं नका. ती फाट मुलगी आहे अगदीं. घरनंबर चुकला हें नशीब समजा तुमचं. नाहींतर तात्यांना तुम्ही पसंत होतातच. अन् तुम्हांला ही पसंत पडली असती कीं लग्न ठरलंच असतं. नशीबानीं तुम्हाला हात दिला.

**श्याम**—सुमति, बघ. तुझे बंधुराज वाटेल ते सांगताहेत तुझ्याबद्दल. तुझ्या साह्याला यायचा अधिकार माला तूं देऊन टाक कशी ?

**सुमति**—माला मुळींच साह्य नको आहे तुमचं. तुम्ही कसलं साह्य करणार तें मघाशीं दिसलच आहे.

**पद्मा**—म्हणजे ? यांच्याशीं पण बिनसलं कां तुझं ? अग अशांनीं तुला पत्करणार कोण ?

**सुमति**---न पत्करूं दे. तुला काय करायचं आहे ?

**श्याम**---ती काळजी नको तुम्हाला. आतां तिला माझा संताप आला आहे. तेवढ्यावरून आमचं बिनसलं असं समजू नका. खरं आहे कां नाहीं सुमति.

**सुमति**---खरं आहे.

**पद्मा**–शाबास, मग इतकावेळ काय लाजत होतीस वाटतं ?

**श्याम**---तुम्हांला तें समजायचं नाहीं. त्याला मानसशास्त्र शिकावं लागतं. माझी खात्रीच होती कीं थोडय वेळांनीं ती ताळ्यावर येईल म्हणून.

**सुमति**---मी ताळ सोडलाच नव्हता कधीं.

**श्याम**---तूं नाहीं मी सोडला होता. बरं. असो. सुमाताई. तुम्ही आतां फक्कडसा चहा करा पाहूं. या प्रभाकरपंताच्या मनाला अजून थोडी रुखरूख राहिलेली दिसते आहे. ती चहांनीं धुऊन जाईल. म्हणजे मग एकंदर प्रकरण नीट मिटलं असं म्हणायला काहीं हरकत नाहीं. नंबर बदलले, घोटाळे झाले, तरी कांहीं फारसं बिघडत नाहीं. काय पद्माकरपंत, तुम्हाला काय वाटतं ?

**पद्मा**---मला काय वाटायचं आहे ? प्रभाकरपंतांचा तर फायदाच झाला आहे. तुम्ही आमच्या बहिणीला फितवलच आहे. तेव्हा तुमचं दोघाचं ठीक आहे. आमचं काहीं तसं नाहीं. तुमच्या या गोंधळांमुळे आम्हाला एक सुरेख बायको मिळणार होती ती मात्र गेली मधल्यामधें.
( सगळे खूप हंसतात. सुमन तोंडावरील हास्य पदराआड करून झटकन् निघून जाते )

**सुमति**---अरे पण तुला ती आवडलीच नव्हती ना बायको. आतां कशाला वाईट वाटून घेतोस उगीच?

[ सुमनच्या पाठोपाठ घरांत जाते.

**श्याम**---चला, वर नानासाहेब बसले आहेत तिकडेच जाऊं आपण.
( श्यामकात व पद्माकर जातात. प्रभकरही जावयास;उठतो. इतक्यांत सुमन कपाटांतून फुलदाणी न्यावयास येते. )

**प्रभा**—सुमाताई इकडे या. तुम्हाला या भानगडींत कांहीं वाईट नाहींना वाटतं ?

**सुमन**—म्हणजे ?

**प्रभा**—शारंगपाणी व्हायच्या ऐवजीं पोतनीस व्हाव लागताहे म्हणून वाईट नाहींना वाटत तुम्हांला ?

**सुमन**—इश्श ( निघून जाते प्रभाकर स्मितपूर्वक तिकडे पहात उभा राहातो. ) [ पडदा.

— समाप्त —